राज्यातील दिव्यांगांच्या कायम विना अनुदानित / विना अनुदानित विशेष शाळा, संलग्न वसतीगृहे, कार्यशाळा(प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे या उपक्रमांच्या अनुदानासंबंधी शासनाचे धोरण.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- इडीडी-२०२२/ प्र.क्र.६५/दि.क.१**
३१ / ३२ / ३५ "ए" विंग, मित्तल टॉवर,बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग,
नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०००२१.
दिनांक : १६ जुलै, २०२४

**वाचा :-**

१. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२००१/प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९ जुलै, २००३,
२. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२००१/प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.४ डिसेंबर, २००३,
३. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२००१ / प्र. क्र.४९०/ सुधार-२, दि.११ ऑगस्ट, २००४,
४. सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२००३ / प्र. क्र.३४० / भाग-३ / सुधार-२, दि.१८ ऑगस्ट, २००४.
५. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०१२ / प्र. क्र ६७ / अ. क. १, दिनांक ०८ एप्रिल, २०१५.
६. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६.
७. महाराष्ट्र दिव्यांग शाळा, प्रशिक्षण केंद्र व मतिमंद बालगृह संहिता, २०१८.
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : अपंग -२०१३ / प्र. क्र. २०१ /अ.क.-२, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ अन्वये निश्चित करण्यात आलेले महाराष्ट्र राज्य दिव्यांग धोरण, २०१८
९. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : इडीडी-२०१७ / प्र. क्र ४९१ / अ. क. १, दिनांक १२ मे, २०२१,
१०. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०२२ / प्र. क्र. २७ / अर्थबळ, दिनांक ८ जून, २०२२,
११. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक : दिकआ / प्र. सर्व / दिव्यांग शाळा धोरण / माहिती / २०२३-२४ / ४१०, दिनांक २३ मार्च, २०२३.

**प्रस्तावना:-**

राज्यातील दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतीगृहे, कार्यशाळा (प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे ही कायमस्वरुपी विना अनुदान / विना अनुदान तत्त्वावर चालविली जातात. सदर उपक्रमांना शासनाकडून निधीच्या उपलब्धतेच्या आधारे वेतन व वेतनेतर अनुदान मंजूर केले जाते. सदर उपक्रमांना वाचा क्र.४ येथील दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या मधील कलम ५२ अनुसार नोंदणी प्रमाणपत्र देणे, त्याचे नुतनीकरण करणे अथवा आवश्यक निकषांच्या पुर्ततेअभावी नोंदणी प्रमाणपत्र नाकारणे अथवा ते रद्द करणे यासाठी शासनाने आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित केले आहे. अपंगांची विशेष शाळा संहिता १९९७ ही संहिता वाचा क्र. ५ अन्वये अधिक्रमित करून

शासनाने सुधारित महाराष्ट्र दिव्यांग शाळा, प्रशिक्षण केंद्र व मतिमंद बालगृह संहिता, २०१८ ही शासन निर्णय दिनांक १८ जुलै, २०१८ आणि सुधारित शासन निर्णय दिनांक ५ फेब्रुवारी, २०१९ अन्वये लागू केलेली आहे.

२. वाचा क्र.६ अन्वये वाचा क्र. ४ मधील तरतुदींच्या अनुषंगाने महाराष्ट्र शासनाने राज्यातील दिव्यांगांच्या कल्याणासाठी महाराष्ट्र राज्य दिव्यांग धोरण, २०१८ विकसित केलेले असून ते दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अंमलात आणलेले आहे. त्यामध्ये दिव्यांगांचे शिक्षण, प्रशिक्षण, रोजगार, स्वयंरोजगार व त्यांच्या उत्थानासाठी निधीच्या उपलब्धतेच्या आधारे सर्वतोपरी सहकार्य करण्याचे राज्य शासनाने उद्दीष्ट ठेवलेले आहे.

३. वाचा क्र.१ व २ अन्वये ज्या दिव्यांगांच्या विशेष शाळा व कार्यशाळा दिनांक ३० ऑक्टोबर २००२ पूर्वी कार्यरत होत्या व सद्यस्थितीत चालू असून त्यास आयुक्त तथा सक्षम प्राधिकारी, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम, १९९५ (अधिक्रमित) व दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ (२०१६ मधील ४९) मधील तरतुदींनुसार नोंदणी प्रमाणपत्र दिलेले आहे व अशा विशेष शाळा / कार्यशाळांना नोंदणी प्रमाणपत्र घेऊन दोन वर्षे पूर्ण झालेली आहेत त्यांना शासनाच्या धोरणानुसार अनुदानासाठी विचार करण्यास पात्र समजण्यात येईल, अशी तरतूद करण्यात आली होती. तसेच वाचा क्र. ३ येथील शासन निर्णय दिनांक ११ ऑगस्ट, २००४ अनुसार दिव्यांग क्षेत्रात विशेष शिक्षण, प्रशिक्षण व पुनर्वसनाचे कार्य करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना केंद्र शासनाकडून व स्थानिक स्वराज्य संस्थांकडून अनुदान मागता यावे, याकरीता राज्य शासनाकडून कोणत्याही स्वरूपाचे अनुदान मागणार नाही, अशा स्वरूपाच्या संस्थेच्या हमीपत्रावर कायमस्वरूपी विनाअनुदान तत्त्वावर अशा उपक्रमांना नोंदणी प्रमाणपत्र देण्याचे धोरण अंमलात आणण्यात आले आहे.

४. त्याचप्रमाणे दिनांक १८ जुलै, २०१८ च्या शाळा संहितेतील प्रकरण २ (५) मध्ये कायम विना अनुदानित / विना अनुदानित दिव्यांगांच्या विशेष शाळा / कार्यशाळा अनुदान तत्त्वावर आणण्यासंबंधी तरतूदी करण्यात आल्या असून त्यामध्ये अनुदान तत्त्वावर मान्यता देण्यासाठी नोंदणी प्रमाणपत्राची आवश्यकता, शासनाचे आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, भौगोलिक व राजनितिक धोरण, नियोजन व निधीची उपलब्धता, भौगोलिक असमतोल दूर करणे,अनाथ दिव्यांग मुलांसाठीच्या शाळा / कार्यशाळांना यांना प्राधान्य, शाळांच्या तपासणीअंती त्यांना दिलेले श्रेणीकरण या बाबींचा समावेश करण्यात आलेला आहे.

५. विभागाच्या दिनांक १९ जुलै, २००३ च्या शासन निर्णयामध्ये विभागाने त्यावेळी अनुदानाचे धोरण निश्चित केलेले नाही. तसेच दिनांक ४ डिसेंबर, २००३ व दिनांक ११ ऑगस्ट, २००४ च्या शासन निर्णयान्वये दिव्यांगांच्या शाळा व कार्यशाळांना अनुदानाबाबत असलेले प्रचलित शासन निर्णय सद्यस्थितीत कालबाह्य झालेले आहेत. त्याचप्रमाणे सन २०१८ च्या शाळा संहितेतील उक्त तरतूदी दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान तत्त्वावर आणण्याच्या दृष्टीने पुरेशा नाहीत. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे रिट याचिका क्र.१०१८०/२०१२ (ग्रामीण श्रमिक प्रतिष्ठान विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) मधील मा. न्यायालयाच्या दिनांक २ सप्टेंबर, २०१३ च्या आदेशान्वये बंद कार्यशाळांना दिव्यांगांच्या निवासी कार्यशाळेच्या धोरणाशिवाय अनिवासी करण्याच्या प्रकरणात अशा शाळांना द्यावयाच्या अनुदानांबाबत धोरण तयार करण्याचे आदेश देण्यात आले आहेत. तसेच मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपुर यांचे रिट याचिका क्र.३०५१/२०१९ (खटेश्वर मागासवर्गीय बहुउद्देशीय व्यावसायिक शिक्षण संस्था विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) मधील मा.न्यायालयाच्या दिनांक ६ सप्टेंबर, २०२१ च्या आदेशान्वये स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या दिव्यांगांच्या कायम विनाअनुदानित/ विनाअनुदानित विशेष शाळांना अनुदान देण्याचे धोरण तयार करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

६. मा. उच्च न्यायालय यांचे आदेश, वित्त विभागाने वेळोवेळी दिलेले निदेश विचारात घेता दिव्यांगांच्या कायम विना अनुदानित / विना अनुदानित विशेष शाळा / कार्यशाळा / अनाथ मतिमंदांची बालगृहे यांना मंजूर करावयाच्या शासन अनुदानासंबंधीचे शासनाचे धोरण तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन या बाबतचा प्रस्ताव मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ५ जुलै, २०२४ रोजी आयोजित बैठकीमध्ये

सादर करण्यात आला होता. त्यासंदर्भात मा. मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन दिव्यांगांच्या कायम विनाअनुदानित / विनाअनुदानित उपक्रमांना अनुदान तत्त्वावर आणण्याबाबत खालीलप्रमाणे धोरण निश्चित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय दिनांक १९ जुलै, २००३, दिनांक ४ डिसेंबर, २००३ तसेच दिनांक ११ ऑगस्ट, २००४ त्याचप्रमाणे विशेष शाळा / कार्यशाळा अनुदान तत्त्वावर आणण्याबाबतचे इतर शासन निर्णय याव्दारे अधिक्रमित करण्यात येत आहेत. तसेच शाळा संहितेतील सुद्धा अनुदानाकरीता शाळा / कार्यशाळेची तपासणी करण्याबाबतच्या बाबी विभागातर्फे या धोरणानुसार संयुक्तिकरित्या सुधारित करण्यात येत आहेत.

२. कायमस्वरूपी विना अनुदान आणि विना अनुदान तत्त्वावर असणाऱ्या दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतिगृहे, कार्यशाळा(प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे याकरीता मुल्यांकन निकष निश्चित करण्याचा व त्या निकषानुसार पात्र ठरलेल्या दिव्यांगांच्या विशेष शाळा, संलग्न वसतिगृहे, कार्यशाळा (प्रशिक्षण केंद्र) आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे (यापुढे "**दिव्यांगांचे उपक्रम**" असे संबोधण्यात येत आहे.) यांना कायमस्वरूपी विना अनुदान तत्त्वावरुन विना-अनुदान तत्त्वावर आणि विना-अनुदान तत्त्वावर वैध नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त असलेल्या उपक्रमांना शासनाचे अनुदान मंजूर करून अनुदान तत्त्वावर आणण्याबाबत व संलग्न बाबींकरीता शासनाचे धोरण खालीलप्रमाणे लागू राहील.

i. यापुढे दिव्यांगांच्या उपक्रमांकरिता नवीन नोंदणी प्रमाणपत्र हे स्वयं अर्थसहाय्यीत (Self Financing) तत्वावरच देण्यात येईल. तसेच, नव्याने नोंदणी प्रमाणपत्र देण्यात आलेल्या स्वयं अर्थसहाय्यीत (Self Financing) उपक्रम भविष्यात कोणत्याही शासकीय अनुदानास पात्र राहणार नाहीत.

ii. ज्या कायम स्वरूपी विनाअनुदान तत्त्वावर नोंदणी प्रमाणपत्र दिलेले दिव्यांगांचे उपक्रम, कुठलाही खंड न पडता त्यांना देण्यात आलेल्या विद्यार्थी संख्येवर ह्या नोंदणी प्रमाणपत्राच्या दिनांकापासून १० वर्षे, शाळा यशस्वीपणे चालू ठेवून विहित निकष पूर्ण करतील, अशा कायम विना अनुदानित दिव्यांगांचे उपक्रम सदर कालावधी संपल्यानंतर "**विना अनुदानित**" म्हणून ग्राह्य धरले जातील. त्याशिवाय विनाअनुदान तत्त्वावर नोंदणी प्रमाणपत्र दिलेल्या तसेच ग्राह्य धरावयाच्या दिव्यांगांच्या उपक्रमांचा नोंदणी प्रमाणपत्राच्या दिनांकापासून ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर, याप्रमाणे एकूण १५ वर्षे पूर्ण झाल्यानंतर "**अनुदानित**" तत्त्वावर मंजूरी देण्यासाठी विचार केला जाईल. कोविड-१९ सारखी आपत्कालीन परिस्थिती वगळता दिव्यांगांचे उपक्रम जर इतर कोणत्याही कारणास्तव ज्या कालावधीकरीता बंद पडले असतील तितका कालावधी त्यांचा पात्रता कालावधीनुसार ज्येष्ठता ठरविताना गणनेतून कमी करण्यात येईल.

iii. केंद्र शासन वा स्थानिक स्वराज्य संस्थांकडून अनुदान प्राप्त राज्यातील दिव्यांगांच्या उपक्रमांना राज्य शासनाचे अनुदान मागणीचा हक्क राहणार नाही.

iv. संबंधित कायम विनाअनुदानित / विनाअनुदानित तत्त्वावरील दिव्यांगांचे उपक्रम हे अल्पसंख्यांक दर्जा प्राप्त असल्यास ते शासनाकडून अनुदानास पात्र ठरल्यानंतर दिव्यांग कल्याण विभागाने दिव्यांगांचे उपक्रमातील कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबींशी वेळोवेळी निश्चित केलेल्या सर्व अटी / शर्ती / नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक असेल व तसे हमीपत्र देणे आवश्यक राहील.

v. एखाद्या संस्थेने एका अगर एकापेक्षा जास्त दिव्यांगांच्या उपक्रमाकरीता नव्याने नोंदणी प्रमाणपत्राची मागणी सक्षम प्राधिकारी यांच्याकडे विहित कार्यपध्दतीने केलेली असेल, अशा दिव्यांगांच्या उपक्रमाकरीता नवीन नोंदणी प्रमाणपत्र देतेवेळी विवक्षित ठिकाणी कार्यरत असलेले दिव्यांगांचे उपक्रम, प्रादेशिक समतोल, भौगोलिक परिस्थिती, तेथील दिव्यांग विद्यार्थी / लाभार्थ्यांची संख्या, प्रवेशितांची उपलब्ध संख्या, शासनाने घोषित केलेला अनुशेष, संबंधित संस्थेकडून दिव्यांगासाठी पुरविण्यात येणाऱ्या

सोयी-सुविधा, प्रचलित निकषांनुसार आवश्यक मूलभूत सुविधा, दिव्यांगांच्या विशेष शाळा व संलग्न वसतिगृहे, कर्मशाळा (प्रशिक्षण केंद्र) आणि संलग्न वसतिगृहे आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे यांच्या संदर्भातील शासनाने मंजूर केलेला बृहत आराखडा, इ. बाबी विचारात घेऊन सक्षम प्राधिकारी यांनी संबंधित विशेष शाळा / कार्यशाळेस स्वयं अर्थसहाय्यित (Self Financing) तत्त्वावरील उपक्रम म्हणून नवीन नोंदणी प्रमाणपत्र प्रदान करणे आवश्यक राहील. असे करताना त्यात ते निवासी वा अनिवासी उपक्रम आहे किंवा कसे व मान्य विद्यार्थी / लाभार्थी तसेच पुरुष व स्त्री संख्या नमूद करतील.

vi. कायम विना अनुदान/ विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यात आलेल्या अल्पसंख्यांक दर्जा प्राप्त दिव्यांगांच्या उपक्रमांना अल्पसंख्याक विकास विभागामार्फत अनुदान मिळत असल्यास सदर शाळांना दिव्यांग कल्याण विभागाकडे अनुदान मागणीचा हक्क राहणार नाही. तसेच, सदर दिव्यांगांच्या उपक्रमांना दिव्यांग कल्याण विभागाचे अनुदान घ्यावयाचे असल्यास त्यांना अल्पसंख्याक विकास विभागाचे कोणत्याही स्वरुपाचे अनुदान घेता येणार नाही.

vii. विद्यार्थी / लाभार्थी तसेच सर्व कर्मचाऱ्यांना आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रिक उपस्थिती शिवाय संबंधित संस्थेच्या दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमास कोणतेही वेतन / वेतनेतर/ परिपोषण इत्यादी अनुदान दिले जाणार नाही. सदर आधार संलग्न- ऑनलाईन बायोमॅट्रीक उपस्थिती प्रणालीवर नोंदवलेली उपस्थिती दरमहा सक्षम प्राधिकाऱ्याकडून व शासनाकडून तपासण्यात येईल व त्यानुसारच उपक्रमास वेतन / वेतनेतर/ परिपोषण अनुदान वितरित केले जाईल. सदर प्रकरणी जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) किंवा सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, (मुंबई उपनगर व शहर करीता) किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी हे सक्षम प्राधिकारी असतील. आधार संलग्न ऑनलाईन बायोमेट्रीक उपस्थिती शिवाय अनुदान वितरित केल्यास सक्षम प्राधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करुन त्यानुसार कारवाई करण्यात येईल.

viii. विनाअनुदान तत्वावरील वैध मान्यता / नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त असलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान तत्त्वावर मान्यता देण्याचे अधिकार **शासनास** राहतील.

ix. संबंधित दिव्यांगांचे उपक्रम संचलित संस्था अनुदानासाठी पात्र ठरविण्यासाठी पुढील बाबी आवश्यक राहतील. १) वैध नोंदणी प्रमाणपत्र २) या संबंधातील दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान तत्त्वावर आणण्याबाबतच्या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्राखालील स्वयंमुल्यनिर्धारण तक्त्यानुसार निकष व गुण विभागणी या बाबींची पुर्तता व त्यानुसार अर्ज ३) शासनाने दिव्यांगांच्या उपक्रमांना मान्यता देण्याबाबत वेळोवेळी निश्चित केलेले किमान पात्रता निकष पूर्ण करणे ४) दिव्यांगांच्या उपक्रमांमधील कर्मचारी नियुक्ती संदर्भात नियुक्तीची शासकीय कार्यपध्दती व आरक्षण धोरणाचे पालन केलेले असणे. ५) मान्य विद्यार्थी संख्येनुसार अर्जाच्या व त्या लगतच्या तीन महिन्यांच्या सरल प्रणालीवरील विद्यार्थ्यांचा आधार व दिव्यांगत्त्वाच्या प्रमाणित व तपासलेल्या माहितीनुसार विद्यार्थ्यांचे पटनिर्धारण झालेले असणे व त्यानुषंगाने कर्मचारी संच मान्यता. ६) मागील ३ वर्षांचे अंकेक्षण (ऑडिट) अहवाल, ७) संस्थेची घटना, ८) सदस्यांची यादी व धर्मादाय आयुक्तांची पदनिहाय मान्यता.

x. संमिश्र स्वरुपातील विशेष शाळा व कार्यशाळांच्या प्रवर्ग बदल / रुपांतरित करण्यासाठी शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील, अशी मान्यता देते वेळी विवक्षित ठिकाणी कार्यरत असलेल्या विशेष शाळा / कार्यशाळा, प्रादेशिक समतोल, भौगोलिक परिस्थिती, प्रवेशितांची उपलब्ध संख्या, शासनाने घोषित केलेला अनुशेष, संबंधित संस्थेकडून दिव्यांगांसाठी पुरविण्यात येणाऱ्या सोयी-सुविधा, प्रचलित निकषांनुसार आवश्यक मुलभूत सोयी-सुविधा, दिव्यांगांच्या विशेष शाळा व संलग्न वसतिगृहे, कर्मशाळा (प्रशिक्षण केंद्रे) आणि संलग्न वसतिगृहे आणि अनाथ मतिमंदांची बालगृहे यांच्या संदर्भातील शासनाने मंजूर केलेला बृहत् आराखडा, इ. बाबी विचारात घेतल्या जातील.

xi. **मुल्यांकन निकष व गुण विभागणी** :- मुल्यांकनातील १०० गुणांची बाब निहाय गुण-विभागणी या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्राप्रमाणे असून त्यामध्ये उपक्रमासंबंधीच्या एकूण १३ मुद्यांचा समावेश आहे.

xii. **अनुदान पात्रतेसाठी आवश्यक गुण :-** अंतिमतः मुल्यांकन निकषानुसार ज्या मान्यताप्राप्त विना-अनुदान तत्त्वावरील दिव्यांगांच्या उपक्रमांना एकूण १०० गुणापैकी किमान ७५ गुण प्राप्त होतील, त्या दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदानासाठी पात्र म्हणून घोषित करण्यात येतील. तथापि, याकरीता उपक्रमाची गुणवत्ता याबाबीसाठी विहित २५ गुणापैकी अनुक्रमांक १ ते ४ बाबींवरील किमान १८ गुण प्राप्त करणे अनिवार्य राहील, त्याशिवाय कोणत्याही विना-अनुदान तत्त्वावरील दिव्यांगांचे उपक्रम अनुदान तत्वावरील मान्यतेसाठी पात्र ठरणार नाहीत.

xiii. **ज्येष्ठतेचे निकष :-** अनुदान निर्धारणासाठी संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमांना दिलेल्या मूळ नोंदणी प्रमाणपत्राचा दिनांक हा संबंधित उपक्रमाच्या नोंदणी प्रमाणपत्राचा जेष्ठतेचा दिनांक म्हणून महत्वाचा निकष असेल. विवक्षित प्रकरणी ज्या दिव्यांगांच्या उपक्रमांच्या नोंदणी प्रमाणपत्राचा दिनांक एकच असेल, त्यावेळी संबंधित नोंदणी प्रमाणपत्राचा अनुक्रमांक ज्येष्ठतेसाठी विचारात घेतला जाईल.

xiv. **बंद पडलेल्या दिव्यांग उपक्रमांच्या हस्तांतरण / स्थलांतरण करणे :-** बंद पडलेल्या कायम विना अनुदानित / विना अनुदानित दिव्यांगांच्या उपक्रमांचे व्यवस्थापन अन्य सक्षम संस्थेस हस्तांतरण व स्थलांतरण करणे किंवा अशा चालू विशेष शाळा / कार्यशाळेचे व्यवस्थापन अन्य सक्षम संस्थेस हस्तांतरण करणे किंवा चालू दिव्यांगांचे उपक्रम एका ठिकाणाहून अन्य ठिकाणी स्थलांतरित करणे, ही प्रक्रीया शासन निर्णय, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१९ अन्वये अथवा शासन सदर धोरणात वेळोवेळी बदल करेल, त्याप्रमाणे पार पाडली जाईल. अशा बंद असलेल्या व अन्य सक्षम संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत केलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांना नव्याने दिलेल्या नोंदणी प्रमाणपत्राचा दिनांक जेष्ठतेचा दिनांक म्हणून ग्राह्य धरण्यात येईल. बंद पडलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांचे मूळ नोंदणी प्रमाणपत्र ते रद्द केलेले अथवा झालेले असल्यास व त्यानंतर हस्तांतरण केलेले असल्यास मूळ दिव्यांगांच्या उपक्रमांच्या नोंदणी प्रमाणपत्राचा दिनांक कोणत्याही परिस्थितीत जेष्ठतेचा दिनांक म्हणून ग्राह्य धरण्यात येणार नाही. परंतु, शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कार्यान्वित / सुरु असलेल्या कायमस्वरुपी विनाअनुदानित / विनाअनुदानित दिव्यांगांच्या उपक्रमांचे व्यवस्थापन एका संस्थेकडून दुसऱ्या संस्थेकडे हस्तांतरण किंवा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी स्थलांतरण झालेले असेल, अशा उपक्रमांना सदरची अट लागू राहणार नाही.

xv. एखादा दिव्यांगांचा उपक्रम प्रस्तुत धोरणानुसार नोंदणी प्रमाणपत्राकरीता जेष्ठताक्रम धारण करीत असला तरी मागील लगतच्या पाच वर्षांच्या कालावधीत संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमाचे नोंदणी प्रमाणपत्र सक्षम प्राधिकारी यांनी दोन किंवा त्यापेक्षा जास्त वेळा रद्द करून शासनाकडून अपिल आदेशान्वये पुनरूज्जीवित झालेले असल्यास अशा दिव्यांगांच्या उपक्रमांच्या मुल्यांकनातील पाच गुण कमी केले जातील. तसेच नव्याने नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर संबंधित नोंदणी प्रमाणपत्राचा दिनांक हा ज्येष्ठताक्रमासाठी विचारात घेतला जाईल.

xvi. अनुदानित दिव्यांगांच्या उपक्रमांमधील विना अनुदानित वाढीव विद्यार्थी / लाभार्थी संख्येस अनुदान मान्यता देतांना देखील सदर धोरणातील निकषांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

xvii. दिव्यांगांच्या अनिवासी उपक्रमांचे निवासी उपक्रमांमध्ये रुपांतर करण्यास मान्यता देताना देखील सदर धोरणातील निकषांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. <u>विनाअनुदान तत्वावरील उपक्रमांना अनुदान तत्त्वावर मान्यता देण्याची कार्यपध्दती :-</u>

अनुदान तत्त्वावरील मान्यतेसाठी इच्छूक असलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांच्या संचलित पालक संस्थेने शासन निर्णयासोबतच्या प्रपत्रामधील निर्धारित निकषानुसार स्वयंमुल्यांकन करुन सविस्तर माहिती व पुराव्यांच्या कागदपत्रांसह आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचेमार्फत खालीलप्रमाणे मुख्य कार्यकारी

अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या जिल्हा मुल्यांकन समितीकडे संबंधित वित्तीय वर्षाच्या दिनांक ३१ ऑक्टोबर पर्यंत प्रस्ताव सादर करणे आवश्यक राहील.

विना अनुदानित दिव्यांग उपक्रमांना अनुदान मागणीचा अर्ज सादर करताना मागील तीन महिन्याच्या विद्यार्थी व कर्मचाऱ्यांचा आधार संलग्न ऑनलाईन बायोमॅट्रीक उपस्थितीचा अहवाल सक्षम प्राधिकाऱ्याव्दारे प्रमाणित करुन सादर करणे आवश्यक राहील.

**<u>जिल्हा मुल्यांकन समिती</u>**

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद (संबंधित जिल्हा)<br>(प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग - मुंबई उपनगर व शहर करीता किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी) | अध्यक्ष |
| २) | संबंधित जिल्ह्यातील शिक्षण अधिकारी (प्राथमिक)- प्राथमिक शाळा उपक्रम असल्यास किंवा शिक्षण अधिकारी (माध्यमिक)- माध्यमिक शाळा उपक्रम असल्यास | सदस्य |
| ३) | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) किंवा सहाय्यक आयुक्त समाज कल्याण, मुंबई उपनगर व शहर (मुंबई उपनगर व शहर करीता संबंधी) किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी | सदस्य सचिव |

४. **जिल्हा मुल्यांकन समितीची जबाबदारी :-**

मुल्यांकन समितीचे सदस्य हे प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर प्राप्त झालेल्या सर्व प्रस्तावातील नमूद दिव्यांगांच्या उपक्रमांची प्रत्यक्ष स्थळ भेट देऊन स्वयंमुल्यांकन नमुन्यानुसार तपासणी करतील व भेटीचा अहवाल तयार करतील. प्रत्यक्ष तपासणीच्या किमान एक दिवस आधी संबंधित संस्थेस याबाबत अवगत करण्यात येईल. जर काही कारणास्तव समितीचे अध्यक्षांना तपासणीसाठी जाणे शक्य नसल्यास ते त्यांचेऐवजी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी यांना दिव्यांगांच्या उपक्रमांच्या तपासणीसाठी नामनिर्देशित करू शकतील.

सदर तपासणी, संबंधित दिव्यांग उपक्रमांच्या वेळेमध्येच होणे आवश्यक आहे. संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमांचे (अक्षांश / रेखांशासहित) फोटो तपासणी अहवालासोबत जोडणे, तसेच दिव्यांग कल्याण आयुक्तालयाच्या संकेतस्थळावर अपलोड करणे आवश्यक राहील. तसेच तपासणीच्या वेळी दिव्यांगांचे उपक्रम बंद असल्याचे निदर्शनास आल्यास २ पंचासमक्ष पंचनामा करून उपक्रमाचे छायाचित्र घेऊन ते तपासणी अहवालासोबत जोडणे आवश्यक राहील. सदर भेटीच्या अहवालाची पालक संस्थेकडून प्राप्त झालेल्या माहिती व कागदपत्रांची मुल्यांकन समितीकडून पडताळणी केली जाईल. कोणत्याही स्तरावर माहिती मागवून वा इतर प्रकारे नमूद बाबींची व मुल्यांकनाची सत्यता पडताळणी करण्याचे अधिकार शासनास राहतील. यानंतर सदर मुल्यांकन समिती त्याबाबतचा सविस्तर अहवाल (गुणदान) तपशिलासह व योग्य त्या अभिप्राय व शिफारशींसह आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या खालील छाननी समितीकडे संबंधित वित्तीय वर्षाच्या दिनांक ३० नोव्हेंबर पर्यंत पाठविल.

उपरोक्त नमूद मुल्यांकन तपासणी व्यतिरिक्त सद्यस्थितीत ज्या ज्या दिव्यांगांच्या उपक्रमांना **अनुदान प्राप्त** आहे, अशा उपक्रमांची संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी यांनी उपरोक्त कार्यपद्धतीनुसार नियमित तपासणी ऑक्टोबर महिन्यामध्ये करावी. तसेच तपासणीचा अहवाल, फोटोंसहित दिव्यांग कल्याण विभाग व आयुक्तालयाच्या संकेतस्थळावर अपलोड करावा व प्रत आयुक्त, दिव्यांग कल्याण यांना पाठवावी. आयुक्त, दिव्यांग कल्याण यांनी सर्व शाळा / कार्यशाळांचा संकलित तपासणी अहवाल १५ जानेवारीपर्यंत शासनास सादर करावा.

**छाननी समिती**

| | | |
|---|---|---|
| १) | आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २) | उप आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |
| ३) | सहाय्यक आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी | सदस्य |
| ४) | निरिक्षक (संबंधित प्रवर्ग) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |

छाननी समितीचे अध्यक्ष तथा आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य हे त्यांच्या विशेषाधिकारात सदर तपासणी समितीच्या कामकाजात सहभागी होण्यासाठी प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग (संबंधित विभाग) किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी यांना तसेच आवश्यकता भासल्यास संबंधित जिल्ह्याचे जिल्हा समाज कल्याण अधिकारी / सहाय्यक आयुक्त किंवा दिव्यांग कल्याण विभागातर्फे निर्देशित इतर संबंधित अधिकारी यांना निमंत्रित सदस्य म्हणून बोलावू शकतील.

५. **छाननी समितीची जबाबदारी :-**

छाननी समितीने मूल्यांकनासाठी प्राप्त झालेले एकूण अर्ज, नोंदणी प्रमाणपत्राच्या दिनांकानुसार तपासावेत. यानंतर छाननी समितीने स्वयंमुल्यांकनाच्या नमुन्यानुसार मुल्यांकन करावे. त्यानंतर संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमांना विना-अनुदान तत्त्वावरुन अनुदान तत्त्वावर मान्यता मिळण्याकरीता, उपक्रमाचा ज्येष्ठताक्रम व इतर बाबी विचारात घेऊन पात्र उपक्रमांचा अहवाल स्वयंस्पष्ट अभिप्रायासह शासनाकडे सादर करावा.

छाननी समिती तपासलेले अर्ज आपल्या अभिप्रायांसह त्यांनी तयार केलेल्या ज्येष्ठताक्रमाच्या यादीसह संबंधित वित्तीय वर्षाच्या दि.१५ जानेवारी पर्यंत शासनाकडे सादर करेल. त्यानंतर खालीलप्रमाणे गठीत राज्यस्तरीय तपासणी समिती सदर अहवालाची तपासणी करेल.

**राज्यस्तरिय तपासणी समिती**

| | | |
|---|---|---|
| **१)** | सह/उप सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | अध्यक्ष |
| **२)** | उप आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| **३)** | अवर सचिव, (दि.क.१) दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य सचिव |
| **४)** | कक्ष अधिकारी, (दि.क.१) दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | सदस्य |

६. **राज्यस्तरिय तपासणी समितीची जबाबदारी:-**

छाननी समितीव्दारे विना-अनुदान तत्त्वावरुन अनुदान तत्त्वावर मान्यता मिळण्याकरीता शासनास सादर करण्यात आलेल्या अहवालाचे अनुषंगाने राज्यस्तरिय तपासणी समितीकडून नोंदणी प्रमाणपत्र नुतनीकरण, दिव्यांग उपक्रमांची ज्येष्ठता, गुणांकन व मुल्यांकन, कर्मचाऱ्यांची नियुक्ती करताना आरक्षण धोरणाचे पालन करण्यात आले आहे किंवा कसे, विद्यार्थी / लाभार्थी यांची आधार संलग्न ऑनलाईन बायोमेट्रीक उपस्थिती, तसेच त्यांचा पटनिर्धारण अहवाल व कर्मचारी संच मान्यता याबाबींची विवक्षित ठिकाणी कार्यरत असलेले दिव्यांगांचे उपक्रम, प्रादेशिक समतोल, भौगोलिक परिस्थिती, प्रवेशितांची उपलब्ध संख्या, शासनाने घोषित केलेला अनुशेष, संबंधीत संस्थेकडून दिव्यांगांना पुरविण्यात येणाऱ्या सोयी-सुविधा, दिव्यांगांसाठी आवश्यक निकषांनुसार उपलब्ध करण्यात आलेले संसाधने व शासनाने मंजूर केलेला बृहत आराखडा, दिव्यांगांच्या उपक्रमाचे हस्तांतरण / स्थलांतरण झाले असल्यास त्याची तपासणी करण्यात येईल. तद्नंतर सदर समिती पात्र दिव्यांगांसाठीच्या उपक्रमांची शिफारस संबंधित वित्तीय वर्षाच्या दिनांक १५ फेब्रुवारीपर्यंत शासनाकडे करील.

७. **अनुदानासाठी पात्र / अपात्र दिव्यांगांच्या उपक्रमांची घोषणा :-**

**अ)** शासनाच्या मान्यतेनंतर मुल्यांकनानुसार अनुदानासाठी पात्र ठरलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांची यादी दिव्यांग कल्याण विभाग, माहे फेब्रुवारी अखेरपर्यंत घोषित करील व यादी घोषित झाल्यानंतर पात्र / अपात्र दिव्यांगांच्या उपक्रमांच्या संदर्भात १५ दिवसांच्या आत आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमांना निर्णय कळविला जाईल. ज्या दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदानासाठी पात्र ठरविण्यात आले नाही, त्यांनी पुढील आर्थिक वर्षात अनुदानासाठी नव्याने अर्ज करणे आवश्यक राहील.

**ब)** अनुदानास पात्र ठरलेल्या दिव्यांगांच्या उपक्रमांना या शासन निर्णयातील परिच्छेद-१५ मध्ये विशद केल्यानुसार अनुदान प्रदान करण्याबाबतची कार्यवाही केली जाईल.

**क)** विना अनुदानित तत्त्वावरील दिव्यांगांचे उपक्रम एकदा अनुदानास पात्र ठरून त्यास अनुदान मंजूर करण्यात आले, परंतु त्यानंतर सलग तीन वर्षांच्या तपासणी अहवालामध्ये “ब” श्रेणीमध्ये आले तर सदर उपक्रमावर तपासणी अहवालामध्ये “क” श्रेणीमध्ये येणाऱ्या उपक्रमांवरील कार्यवाहीप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.

**ड)** तपासणी अहवालामध्ये “क” श्रेणीमध्ये येणाऱ्या दिव्यांगांच्या उपक्रमांवर खालीलप्रमाणे शासनाकडून कार्यवाही करण्यात येईल.

१) परिपोषण अनुदानाव्यतिरिक्त इतर वेतनेतर अनुदान संपूर्णत: किंवा अंशत: रोखणे किंवा

२) किमान रुपये ३ लक्ष ते कमाल रुपये १० लक्ष इतकी (वार्षिक) दंडात्मक कार्यवाही किंवा

३) मान्यता रद्द करणे

उक्त ड (२) च्या प्रयोजनार्थ संस्थेचे सचिव व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या संयुक्त खात्यात रु.५ लक्ष इतकी अनामत रक्कम राष्ट्रीयकृत बँकेत ठेवीच्या स्वरुपात जमा असणे बंधनकारक असेल.

**इ)** ज्या दिव्यांगांच्या उपक्रमांचे नोंदणी प्रमाणपत्र रद्द केले आहे, वा विहित मुदतीत नूतनीकरण न केल्याने रद्द झाले आहे व ज्यांची नोंदणी प्रमाणपत्रे रद्द करण्याच्या आदेशाविरुद्ध कोणतेही, विहित कालावधीत व विहित प्राधिकरणाकडे केलेले अपिल प्रलंबित नाही, व त्यामुळे त्या बंद आहेत, अशा दिव्यांग उपक्रमांची अनुदान मान्यता कायमस्वरुपी रद्द करण्यात येईल.

८. सदर धोरण अंमलात येण्यापूर्वी ज्या संस्थांनी अनुदान तत्त्वावर मान्यता मिळण्यासाठी शासनाकडे मागणी नोंदविलेली आहे, अशा दिव्यांगांच्या उपक्रमांची मागणी या धोरणान्वये निकाली काढण्यात येत असून सदरचे धोरण अंमलात आल्यानंतर संबंधित उपक्रम संचलित संस्थांनी अनुदान तत्त्वावर मान्यता मिळण्यासाठी नव्याने मागणी नोंदविणे बंधनकारक राहील. तथापि हे धोरण अंमलात येण्याच्या आधी संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान मंजूर करण्यासंदर्भात मा.न्यायालयाचे काही आदेश असल्यास या शासन निर्णयातील तरतूदींस अनुसरुन सक्षम प्राधिकारी व वित्त विभागाच्या मान्यतेने प्रकरणपरत्त्वे उचित निर्णय घेण्यात येईल. त्याचप्रमाणे सदर धोरण अंमलात येण्यापूर्वी मा. मुख्यमंत्री किंवा मा. मंत्री (दिव्यांग कल्याण) यांचे मान्यतेने विशेष बाब म्हणून ज्या दिव्यांगांच्या उपक्रमांना अनुदान तत्त्वावर मंजूरी देण्यात आलेली आहे, अशा प्रकरणीसुद्धा या शासन निर्णयातील तरतूदींस अनुसरुन सक्षम प्राधिकारी व वित्त विभागाच्या मान्यतेने उचित निर्णय घेण्यात येईल.

९. **अनुदान हा शासनाचा स्वेच्छाधिकार :-**

१) राज्यातील कायम विना / विना अनुदान तत्त्वावर कार्यरत दिव्यांग उपक्रमांची विहित निकषांनुसार तपासणी केल्यानंतर “अ” श्रेणीमधील विनाअनुदानित उपक्रमांना अनुदान तत्त्वावर मंजूरी देण्यात येईल.

२) संबंधित वित्तीय वर्षातील अशा अनुदान पात्र दिव्यांगांच्या उपक्रमांसाठी अपेक्षित असलेल्या वेतन / वेतनेतर अनुदानाच्या निधीसाठी संबंधित वित्तीय वर्षाच्या पुढील वर्षामध्ये अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात येईल.

३) अनुदानास पात्र दिव्यांगांच्या उपक्रमांची यादी अंतिम झाल्यानंतर त्यांना अनुदान देतेवेळी स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल. सदरचे अनुदान भूतलक्षी / पूर्वलक्षी प्रभावाने लागू केले जाणार नाही.

४) अनुदानास पात्र दिव्यांगांच्या उपक्रमांना वेतन व वेतनेतर व इतर अनुदान हे दिनांक १८ जुलै, २०१८ व दिनांक ५ फेब्रुवारी, २०१९ च्या शाळा संहितेमधील तरतूदी तसेच त्यानंतर वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणा यांस अनुसरुन मंजूर करण्यात येईल.

१०. एखादा दिव्यांगांचा उपक्रम जर सतत पाच वर्षे मुल्यांकनात अपात्र ठरल्यास त्यावर्षीच्या प्रस्तावातील संबंधित दिव्यांगांच्या उपक्रमाचा ज्येष्ठताक्रम आपोआप संपुष्टात येईल व त्या उपक्रमास त्यापुढील सलग ३ वर्षे मुल्यांकनात पात्र ठरल्यानंतरच सदर उपक्रमाचा पुढील कालावधीत अनुदानासाठी विचार करण्यात येईल.

११. सदर धोरणाप्रमाणे वर्षातून एकदाच म्हणजेच संबंधित वित्तीय वर्षाच्या माहे ऑक्टोबर ते फेब्रुवारी या महिन्यात अनुदान मान्यता प्रक्रियेची कार्यवाही करणे बंधनकारक राहील. परंतु, शासन सदर अनुदान मान्यता प्रक्रिया कोणत्या एका किंवा अधिक वित्तीय वर्षांकरीता राबवू नये, असे निर्देश देऊ शकेल.

१२. **दिव्यांगांचा उपक्रम बंद असताना वेतन / वेतनेतर निधी अनुज्ञयतेबाबत :-** विद्यार्थी / लाभार्थ्यांच्या पुरेशा संख्येअभावी किंवा पुरेशा सोयी-सुविधांचा अभाव वा अन्य कारणास्तव अनुदानित दिव्यांगांचा उपक्रम बंद झाला असेल किंवा नोंदणी प्रमाणपत्र रद्द केल्यामुळे बंद झालेला असेल, तर अशा उपक्रम बंद असलेल्या कालावधीतील वेतन / वेतनेतर निधी / अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. तसेच सदर दिव्यांगांच्या उपक्रमांच्या बाबतीत अपिलीय प्राधिकरण तथा शासनाने सदर उपक्रमांचे नोंदणी प्रमाणपत्र पूर्ववत करण्याचा निर्णय दिल्यास सदर निर्णयाची अंमलबजावणी, संबंधित उपक्रमांनी केल्यानंतर वेतन / वेतनेतर निधी अनुज्ञेय करण्यासाठी विभागाची मान्यता घेणे बंधनकारक राहील. अशा प्रकारची मान्यता पूर्वलक्षी प्रभावाने करता येणार नाही. तसेच, सदर उपक्रमास उपक्रम बंद असलेल्या काळातील वेतन व वेतनेतर अनुदान मिळणार नाही.

तथापि नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्याच्या आयुक्त, दिव्यांग कल्याण यांच्या आदेशास जर अपिलिय प्राधिकारी यांनी किंवा मा. उच्च न्यायालयाने स्थगिती दिली व त्यामुळे संबंधित दिव्यांगांचा उपक्रम चालू राहिला तर त्यास स्थगिती कालावधीसाठी वेतन / वेतनेतर अनुदान अनुज्ञेय राहिल.

१३. एखाद्या दिव्यांगांच्या उपक्रमास शासन मान्यतेने प्रत्यक्ष अनुदान निरंतरपणे मिळत असल्यास व दरम्यानच्या काळात सदर उपक्रमाचे नोंदणी प्रमाणपत्र रद्द करण्यात आलेले असल्यास आणि त्याविरुद्ध विहित मुदतीत दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ अनुसार अपिलिय प्राधिकरणाकडे दाखल केलेले अपिल प्रलंबित असल्यास अशा उपक्रमांतील मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांच्या समायोजनाबाबत आयुक्त, दिव्यांग कल्याण यांनी दिनांक १२ मे, २०२१ च्या परिपत्रकानुसार तसेच याविषयासंदर्भात वेळोवेळी होणाऱ्या सुधारणांनुसार कार्यवाही करणे बंधनकारक राहील.

१४. ज्या अनुदानित उपक्रमांना विहित कार्यपद्धती अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने विद्यार्थी / लाभार्थी वाढ मंजूर करण्यात आलेली आहे, अशा वाढीव विद्यार्थ्यांच्या प्रमाणात वाढीव वेतन व वेतनेतर अनुदान, अशा मान्यतेच्या वित्तीय वर्षाच्या व त्यापुढील पहिल्या शैक्षणिक वर्षासाठी अनुज्ञेय असणार नाही. त्यानंतर संबंधित विशेष शाळा / कार्यशाळा वाढीव अनुदानासाठी पात्र होईल. असे वाढीव विद्यार्थी मंजूर करताना अनुदान मंजूरीच्या निकषांनुसार शासन स्तरावर वित्त विभागाच्या पूर्वमान्यतेने निर्णय घेण्यात येईल.

१५. सदर धोरण अंमलात आणल्यानंतर दिव्यांगांच्या उपक्रमांस अनुदान तत्त्वावर शासन मान्यता मिळाल्यानंतर प्रत्येक दिव्यांगांच्या उपक्रमास विभागाच्या दिनांक १८ जुलै, २०१८ व दिनांक ६ फेब्रुवारी, २०१९

च्या शाळा संहितेच्या शासन निर्णयानुसार वेतन, वेतनेतर अनुदान (कर्मचाऱ्यांच्या वेतनाच्या ८ टक्के), इमारत भाडे म्हणून प्रत्यक्ष अदा केलेल्या रकमेच्या ७५ टक्के रक्कम तसेच परिपोषण अनुदान (दिनांक ३ मार्च, २०१९ च्या शासन निर्णयानुसार दिव्यांगांच्या विशेष शाळांबाबत प्रति दिव्यांग विद्यार्थी रुपये १५००/-, मतिमंद विद्यार्थी रुपये १६५०/- व दिनांक १ नोव्हेंबर, २०१७ च्या शासन निर्णयानुसार मतिमंदांच्या बालगृहांबाबत प्रति विद्यार्थ्यासाठी रुपये २०००/- प्रति महिना) या प्रमाणे अनुदान देय राहील. तसेच या विषयासंदर्भात वेळोवेळी करण्यात येणाऱ्या सुधारणांप्रमाणे अनुदान देय राहिल.

१६. अनुदान तत्वावर मान्यता दिलेल्या दिव्यांग उपक्रमांना -

**अ)** शासन निर्णय, दिनांक १८ ऑगस्ट, २००४ च्या आकृतीबंधाप्रमाणे व मान्य विद्यार्थी संख्येनुसार निवासी दिव्यांग शाळेस व कार्यशाळेस शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची अनुज्ञेय असणारी पदे मंजूर करण्यात यावीत.

**आ)** शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी विहित केलेली भरती / नियुक्तीची शासकीय कार्यपध्दती व आरक्षण धोरण यांचे पालन करूनच पदभरती करणे बंधनकारक असेल.

**इ)** सदर उपक्रमांमधील पदांना मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव मा. उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेस्तव सादर करताना सदर प्रस्तावामध्ये दिव्यांग उपक्रमनिहाय आधार लिंक ऑनलाईन बायोमॅट्रीक उपस्थितीबाबतचा अहवाल सादर करणे बंधनकारक राहील.

ज्या संस्था वरील तरतूदींचे पालन करणार नाही, अशा संस्थांच्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा केले जाणार नाही. शासनाच्या आरक्षण धोरणाविरुध्द अथवा अधिनियमाविरुध्द नियुक्त केलेल्या शिक्षक/ शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याची जबाबदारी ही सर्वस्वी संबंधित संस्थेची राहिल.

१७. संस्थेने दिव्यांग उपक्रमात मंजूर कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची नियुक्ती केल्यास अशा अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतनाची सर्वस्वी जबाबदारी ही संपूर्णतः त्या संबंधित संस्थेची असेल. अशा अतिरिक्त नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनाची जबाबदारी शासनाची राहणार नाही.

१८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय दि. १८ जुलै, २०१८ अन्वये दिव्यांगांच्या विशेष शाळा, कर्मशाळा प्रशिक्षण केंद्र, संलग्न वसतिगृह, मतिमंद बालगृह, शीघ्र निदान व शीघ्र उपचार केंद्राकरीता लागू करण्यात आलेल्या विशेष शाळा संहितेमधील प्रकरण २ (आठ) मध्ये नमूद तरतुदीनुसार अस्थिव्यंग प्रवर्गातील शाळांना नव्याने मान्यता / नोंदणी प्रमाणपत्र देण्यात येऊ नये. अशा उपक्रमांमधील विद्यार्थ्यांचे सर्वसाधारण शाळांमध्ये प्रथम समावेशन करुनच उर्वरित विद्यार्थी संख्येनुसारच दिव्यांग उपक्रमांस अनुदान वितरित करण्यात यावे.

१९. सदरील अनुदान तत्वावर मान्यता द्यावयाच्या दिव्यांग उपक्रमांना निधीच्या उपलब्धतेनुसार अनुदान वितरीत करण्यात येईल.

२०. दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अनुदान त्यांच्या बँक खात्यातच जमा करण्यात येईल.

२१. प्रत्येक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमाच्या मुख्यालयाच्या ठिकाणीच वास्तव्यास असणे आवश्यक आहे. तसेच वसतिगृह अधिक्षक /गृहपाल यांनी वसतीगृहातच राहणे आवश्यक आहे. सुटी व्यतिरिक्त त्यांची अनुपस्थिती त्यांची गैरहजेरी समजण्यात यावी. काळजीवाहक, मदतनीस, राखणदार / पहारेकरी यांची सुध्दा त्यांना नेमून दिलेल्या वेळापत्रकाखेरीज त्यांची अनुपस्थिती त्यांची गैरहजेरी समजण्यात यावी. सदर गैरहजेरी कालावधीचे त्यांचे वेतन कपात करण्यात यावे.

२२. संस्थेच्या अनुदानित दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमांना आधार संलग्न-ऑनलाईन बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीची यंत्रणा / मशीन पुरविण्यात येत असून, त्या कार्यान्वित झाल्यानंतर त्यांनी सदर प्रणालीवर विद्यार्थी शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची उपस्थिती नोंदविणे अनिवार्य आहे. सदर यंत्रणा / मशीन्स ज्या संस्थेच्या दिव्यांग निवासी उपक्रमांना पुरविण्यात आली नसेल त्यांनी सदर बाब संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याच्या निदर्शनास तात्काळ आणून द्यावी व सदरील यंत्रणा / मशीन्स आपल्या दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमांमध्ये कार्यान्वीत करुन घ्यावी. ज्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमांना सदरील यंत्रणा / मशीन पुरविण्यात आली आहे, परंतु ती सध्या नादुरुस्त असेल तर ती यंत्रणा / मशीन संबंधितांकडून तात्काळ दुरुस्त करुन कार्यान्वित करुन घ्यावी. तसेच सदरील यंत्रणा / मशीन देखभाल दुरुस्तीचा खर्च संबंधित संस्थेने त्यांच्या दिव्यांग निवासी / अनिवासी शाळेस अथवा कर्मशाळेस मिळणाऱ्या वेतनेतर अनुदानातून करावा अथवा संस्थेने स्वतः खर्च करावा, मात्र, आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीद्वारे प्राप्त झालेल्या उपस्थिती अहवालाशिवाय संबंधित संस्थेच्या दिव्यांग निवासी /अनिवासी शाळेस अथवा कर्मशाळेस कोणतेही अनुदान दिले जाणार नाही.

२३. अनुदानित अनिवासी शाळा / कर्मशाळांतील सर्व विद्यार्थी, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी सदरील बायोमॅट्रीक प्रणालीद्वारे आपली उपस्थिती सकाळी १०.०० वाजता आणि विद्यार्थ्यांनी शाळा सुटल्यानंतर आणि शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी त्यांच्या नियमित कार्यालयीन वेळेनंतर नोंदविणे आवश्यक आहे. सदर प्रणालीवर उपस्थिती नोंदविल्याशिवाय आणि प्रत्येक महिन्याची उपस्थिती सक्षम अधिकाऱ्याकडे म्हणजे आयुक्त, दिव्यांग कल्याण, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, अथवा जिल्हा समाज कल्याण अधिकारी अथवा शासनाकडे प्राप्त झाल्याशिवाय समाजसेवार्थ प्रणालीमार्फत अदा करण्यात येणारे वेतन अदा केले जाणार नाही. जोपर्यंत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रीक प्रणाली उपस्थिती सक्षम प्राधिकाऱ्यास अथवा शासनास प्राप्त होणार नाही. तोपर्यतच्या कालावधीचे वेतन अनुदान संबंधित शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना अदा करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबधित संस्थेची राहील. त्यासाठी शासन जबाबदार असणार नाही.

२४. दिव्यांग अनुदानित निवासी शाळेतील प्रत्येक विद्यार्थ्यांची त्याचप्रमाणे निवासी शाळा व कर्मशाळेसाठी आवश्यक असलेल्या संबंधित कर्मचाऱ्यांची देखील आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रीक प्रणालीवर उपस्थिती सकाळी १०.०० वाजता व रात्री ९.०० वाजता नोंदविणे आवश्यक आहे. सदर प्रणालीवर नोंदविलेली उपस्थिती दरमहा सक्षम प्राधिकाऱ्याकडून व शासनाकडून तपासण्यात येईल व त्यानुसारच विद्यार्थ्यांना परिपोषण अनुदान वितरीत केले जाईल. सदर प्रणालीद्वारे विद्यार्थ्याची उपस्थिती प्राप्त न झाल्यास विद्यार्थ्याचे परिपोषण अनुदान शासनातर्फे दिले जाणार नाही. जोपर्यंत विद्यार्थ्यांची उपस्थिती आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रीक प्रणालीद्वारे सक्षम प्राधिकाऱ्यास अथवा शासनास प्राप्त होणार नाही. तोपर्यतच्या कालावधीचे परिपोषण अनुदान विद्यार्थ्यांना देण्याची संपूर्ण जबाबदारी ही संबंधित संस्थेची असेल.

२५. ज्या संस्थेच्या दिव्यांग शाळेत / कर्मशाळेत जेवढे दिव्यांग विद्यार्थी उपस्थित असतील त्यांच्या (जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर) तीन महिन्यांच्या उपस्थितीच्या सरासरीनुसार (आधार संलग्न- ऑनलाईन बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीवरील) शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची पदे मंजूर करण्यात येतील. त्यानुसारच परिपोषण अनुदान, वेतन व वेतनेतर अनुदान आणि इमारत भाडे अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२६. संस्थेने दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमासाठी आवश्यक असलेल्या सर्व भौतिक / शैक्षणिक सुविधा पुरविणे आवश्यक राहील. जी संस्था अशा प्रकारच्या भौतिक व शैक्षणिक सुविधा पुरविणार नाही अशा संस्थेच्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमांना वेतनेतर अनुदान व इमारत भाडे अनुज्ञेय असणार नाही, संबंधित संस्थेने सदरहू बाबीवरील खर्च स्वतः करावा, त्यासाठी शासन जबाबदार असणार नाही.

२७. संबंधित संस्थेच्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमास ज्या दिव्यांगत्त्व प्रकारावरील उपक्रम चालविण्याची परवानगी / मान्यता / अनुज्ञप्ती दिली आहे, त्या दिव्यांगत्त्वाच्या प्रकारातील कोणत्याही विद्यार्थ्यास (तो अतिव्यंग / एचआयव्ही बाधीत असला तरीही) प्रवेश नाकारला जाणार नाही. सदरील बाब

सक्षम प्राधिकाऱ्याच्या अथवा शासनाच्या निदर्शनास आल्यास अशा दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमावर तात्काळ कारवाई करण्यात येईल व अशा दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमाची मान्यता रद्द करण्यात येईल.

२८. अनुदान प्राप्त संस्थांच्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमांनी दिव्यांग विद्यार्थ्यांची राहण्याची व भोजनाची यथायोग्य व्यवस्था करणे आवश्यक राहील. तसेच सदरहू विद्यार्थ्यांची स्वच्छता, त्यांच्या खोलीची साफसफाई, स्वच्छ गणवेष व पोषाख, पुरविणे, नखे व केस वेळेच्यावेळी कापणे, लैंगिक शोषण होणार नाही याबाबत अत्यंत दक्षपणे काळजी घेणे, वयात आलेल्या मुलींची विशेष काळजी घेणे, चुलीवर स्वयंपाक न करणे, विद्यार्थ्यांना आंघोळीसाठी गरम पाणी पुरविणे, स्वच्छ व निर्जंतुक पिण्याच्या पाण्याची सोय करणे, खेळाचे व मनोरंजनाचे साहित्य पुरविणे, उपक्रमात बसण्यासाठी डेस्क, बेंच उपलब्ध करुन देणे, झोपण्याची आणि अंथरुण पांघरुणाची पुरेशी आणि व्यवस्थित सोय करणे, हिवाळ्यात ब्लॅकेटस् पुरविणे, त्यांच्या आरोग्याची वेळोवेळी तपासणी करुन त्यांच्या आरोग्याची काळजी घेणे इत्यादी प्रकारच्या सोयी सुविधा पुरविणे आवश्यक राहील. जे दिव्यांगांचे उपक्रम यांची अंमलबजावणी करणार नाही, त्यांना वेतनेतर अनुदान व इमारत भाडे अदा केले जाणार नाही आणि आवश्यकता भासल्यास अशा दिव्यांग उपक्रमांची मान्यता रद्द करण्याची कारवाई करण्यात येईल.

२९. अनुदान प्राप्त संस्थांच्या दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमांनी दिव्यांग विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता उंचावणे आवश्यक आहे. सदरील दिव्यांग विद्यार्थ्यांची शैक्षणिक गुणवत्ता सुमार असल्याचे निदर्शनास आल्यास अशा संस्थेच्या दिव्यांग उपक्रमांविरुद्ध कडक कारवाई करण्यात येईल.

३०. अनुदान तत्त्वावर मान्यता असलेल्या कोणत्याही संस्थेच्या दिव्यांग निवासी / अनिवासी उपक्रमास नवीन पदभरती करता येणार नाही. प्रथमतः दिव्यांग उपक्रमामधून अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे समायोजन करण्यात येईल. ज्यावेळी संबंधित दिव्यांग उपक्रमामध्ये नवीन पद भरण्यास मान्यता द्यावयाची असेल, त्यावेळी सक्षम प्राधिकाऱ्याने लगतच्या जिल्ह्यात, विभागात व तद्नंतर राज्यात अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी उपलब्ध नसल्याची प्रथमतः खातरजमा करावी. खातरजमा केल्यानंतर अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी उपलब्ध न झाल्यास संबंधित संस्थेच्या दिव्यांग शाळेस अथवा कर्मशाळेस पदभरतीसाठी ना-हरकत प्रमाणपत्र द्यावे. त्यानंतर जिल्ह्याच्या, विभागाच्या व राज्याच्या जास्त खप असलेल्या वर्तमानपत्रात जाहिरात देऊनच पदे भरण्याची अनुमती सक्षम प्राधिकाऱ्याने द्यावी. मात्र, दिव्यांग शाळा / कर्मशाळेतील अतिरिक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी उपलब्ध असताना संबंधित संस्थेस शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी भरण्यास परवानगी दिल्याची बाब निदर्शनास आल्यास संबंधित अधिकाऱ्याविरुध्द कडक कारवाई करण्यात येईल.

३१. अस्थिव्यंग प्रवर्गाच्या दिव्यांग शाळेत/कर्मशाळेत जे अस्थिव्यंग विद्यार्थी कोणत्याही आधाराविना चालू शकत नाहीत, अशा अस्थिव्यंग विद्यार्थ्यांना अस्थिव्यंग प्रवर्गाच्या शाळेत प्रवेश देण्यात यावा. अस्थिव्यंग प्रवर्गातील जे विद्यार्थी कोणताही आधार घेऊन चालू शकत असतील अशा विद्यार्थ्यांना सर्वसाधारण शाळेत प्रवेश घेण्याची सक्ती करण्यात यावी. सर्वसाधारण शाळेत अशा अस्थिव्यंग प्रवर्गाच्या विद्यार्थ्यास प्रवेश देऊन त्यास नियमानुसार आवश्यक असलेल्या सर्व बाबी पुरविण्यात याव्यात व आवश्यक त्या सर्व सवलतींचा लाभ देण्यात यावा. जेणेकरुन अशा अस्थिव्यंग प्रवर्गातील विद्यार्थ्यास समाजजीवनाच्या मुख्य प्रवाहात आणून त्यांना सर्वसाधारण विद्यार्थ्यांप्रमाणे समान संधी देऊन त्यांना स्वावलंबी करण्याचा शासनाचा हेतू सफल होईल. मात्र, कोणत्याही आधाराशिवाय चालू शकणा-या विद्यार्थ्यास सर्वसाधारण शाळेत प्रवेश न देता अस्थिव्यंग प्रवर्गाच्या शाळेत प्रवेश दिल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिकाऱ्यावर व संबधित शाळेच्या मुख्याध्यापकावर शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल. तसेच संबंधित संस्थेच्या अस्थिव्यंग शाळेचे अथवा कर्मशाळेचे वेतनेतर अनुदान तात्काळ बंद करण्यात येईल.

३२. सदरील अनुदान तत्वावर मान्यता देण्यात येणाऱ्या आणि जे दिव्यांगांचे उपक्रम सध्या शासनाचे अनुदान घेत आहेत, अशा विविध दिव्यांगत्त्वाच्या प्रकारातील उपक्रमात नियुक्त करण्यात आलेले विशेष शिक्षक, विशेष व्यवसाय शिक्षण निदेशक, विशेष कला / हस्तकला / चित्रकला / संगीत / शारिरीक शिक्षण

निदेशक हे त्या-त्या दिव्यांग प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यास पात्र आहेत किंवा कसे, तसेच त्यांनी त्याबाबतची विशेष शैक्षणिक अर्हता धारण केली आहे किंवा कसे, याबाबतची खातरजमा करुनच पद मान्यता देण्यात यावी. ज्या दिव्यांग निवासी उपक्रमात अशा प्रकारची विशेष शैक्षणिक अर्हता नसल्याचे शिक्षक / निदेशक निदर्शनास आल्यास अशा विशेष शिक्षक व विशेष निदेशकांच्या पदांना मान्यता देण्यात येऊ नये. विशेष शैक्षणिक अर्हता नसलेल्या शिक्षक व निदेशकांच्या नियुक्तीस मान्यता दिल्याची बाब निदर्शनास आल्यास संबंधित अधिकाऱ्याविरुध्द कडक कारवाई करण्यात येईल. तसेच अशा अपात्र विशेष शिक्षक व निदेशकांचे वेतन अनुदान शासनातर्फे अदा केले जाणार नाही.

३३. संबंधित दिव्यांगांच्या अनुदानित उपक्रमांची मागील ५ वर्षाच्या अभिलेखांची तपासणी करुन मान्य विद्यार्थी संख्या व प्रत्यक्षातील उपस्थित विद्यार्थी संख्या यांची तपासणी करावी. मागील वर्षी प्रवेशित झालेला विद्यार्थी पुढील वर्षी पुढच्या वर्गात प्रवेशित झाला किंवा नाही, याची तपासणी करुन पुढील वर्षात प्रवेशित न होण्याची कारणे जाणून घ्यावी. तसेच मागील ५ वर्षात ज्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना मान्यता देण्यात आलेली आहे, तेच कर्मचारी सदरहू शाळेत सध्या कार्यरत आहेत किंवा नाहीत, याचीही तपासणी करावी. मान्यता प्राप्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणासही मान्यता शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय देण्यात येऊ नये. तसेच कोणतेही नवीन पद भरण्यास परवानगी देण्यात येऊ नये. तशी बाब शासनाच्या निदर्शनास आल्यास संबंधित अधिकाऱ्याविरुध्द कडक कारवाई करण्यात येईल.

३४. शासनाच्या मान्यतेशिवाय सदरहू दिव्यांग निवासी /अनिवासी उपक्रमाच्या विद्यार्थी संख्येमध्ये तसेच कर्मचारी संख्येमध्ये बदल करण्यात येऊ नये. अनुदान मंजूर करण्यापूर्वी ज्या दिव्यांग निवासी उपक्रम शासनाच्या अटी / शर्तीची पुर्तता करतील अशा दिव्यांग उपक्रमांनाच अनुदानासाठी पात्र ठरविण्यात यावे.

३५. राज्यातील दिव्यांगांच्या उपक्रमांसंदर्भात आढावा घेऊन तसेच विविध दिव्यांगत्त्व असलेल्या दिव्यांगांची संख्या विचारात घेऊन राज्यासाठी दिव्यांगांच्या उपक्रमांचा बृहत् आराखडा तात्काळ तयार करण्यात यावा.

३६. सदर विशेष दिव्यांग उपक्रमास विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्यास आणि निधीची उपलब्धता विचारात घेऊन नियमित अनुदान मंजूर करण्यात येईल.

३७. दिव्यांगांच्या उपक्रमांना केंद्र शासन, राज्य शासन, स्थानिक संस्थांकडून किंवा इतर माध्यमांकडून नियमित अनुदान मिळत आहे, असे निदर्शनास आल्यास अशा दिव्यांग उपक्रम / संस्था राज्य शासनाचे अनुदान मिळण्यास अपात्र ठरतील.

३८. शासनाने अनुदान तत्त्वावर आणण्याकरिता वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्ती आणि कार्यपध्दतीचे पालन झालेले नाही, असे आढळून आल्यास त्या संस्थेची मान्यता रद्द करण्यात येईल.

३९. दिनांक ८ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयान्वये ज्या शाळा / कार्यशाळांना विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून अनुदान तत्त्वावर मान्यता दिली आहे, त्या अटी व शर्ती संबंधित शाळा / कार्यशाळांना शासन निर्णयाच्या दिनांक ८ एप्रिल, २०१५ पासून लागू आहेत. तसेच या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या धोरणातील अटी / शर्ती ह्या सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून दिव्यांग कल्याण विभागांतर्गत असलेल्या यापूर्वीच्या अनुदानित उपक्रमांसहित सर्व अनुदानित दिव्यांग उपक्रमांना लागू राहिल.

४०. सदर अनुदानीत दिव्यांगांच्या उपक्रमांवर होणारा खर्च निधी उपलब्ध झाल्यानंतर शासनाकडून वितरीत करण्यात येईल. तसेच त्यापुढील वर्षाचा खर्च त्या-त्या लेखाशिर्षाखालील त्या-त्या वर्षी उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४१. सदर शासन निर्णय मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक ५ जुलै, २०२४ रोजी आयोजित बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४२.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०७१६१६२३३८८६३५ असा आहे. तसेच सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT
NAMDEORAO BHANGE

Digitally signed by SUMANT NAMDEORAO BHANGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=17b7f71196a30f5dadd3859d04bf654ed8b2dd1177972936de56dcefe4daa38e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1FB1B48850CC3E5A74179F14C10EC607D89BEA3022F75E225829CC7525E64558, cn=SUMANT NAMDEORAO BHANGE
Date: 2024.07.16 16:37:00 +05'30'

**( सुमंत भांगे )**
**सचिव, दिव्यांग कल्याण विभाग**

**प्रत :**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३) मा. उपमुख्यमंत्री (गृह) / (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४) मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
५) मा. अध्यक्ष, विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई,
६) मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
७) मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
९) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१०) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर,
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
१३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरेक नं. १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई ४०० ०२०,
१५) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय), समिती, टिळक भवन, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२५,
१६) राष्ट्रवादी काँग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई ४०००२१,
१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई ४०० ०२८,
१८) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई ४०० ००१,
१९) भारतीय कम्युनिस्ट पाटी, महाराष्ट्र कमेटी, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई,
२०) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई,
२१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई ४०० ०२८,
२२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
२३) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
२५) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
२६) सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर / उपनगर,
२७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
३०) निवड नस्ती.

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

**जिल्ह्याचे नांव :-**

**संस्थेचे नांव व संपूर्ण पत्ता :-**

**उपक्रमाचे नांव व संपूर्ण पत्ता :-**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td>I</td><td>उपक्रमाची गुणवत्ता</td><td>२५</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>१.</td><td>१) सर्व प्रवर्गांतील विशेष शाळांमधील प्रवेशितांच्या सरल प्रणाली अंतर्गत युडीआयडी प्रमाणपत्र व आधार कार्ड संलग्नतेसह नोंदीबाबत :-
<table>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्या (संख्या)</td><td></td></tr>
<tr><td>विद्यार्थ्यांच्या युडीआयडी प्रमाणपत्र सरलवरील संलग्न नोंदी (संख्या)</td><td></td></tr>
<tr><td>विद्यार्थ्यांच्या आधार कार्ड संलग्न नोंदी (संख्या)</td><td></td></tr>
</table>
अ) सरल प्रणाली अंतर्गत विद्यार्थ्यांच्या वैध युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेसह नोंदी
<table>
<tr><th>टक्केवारी</th><th>सरल प्रणाली अंतर्गत युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेसह नोंद</th></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या १०० टक्के किंवा अधिक</td><td>५ गुण</td></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या ९० टक्के वा ९० टक्क्यांपेक्षा अधिक परंतु १०० टक्क्यांपेक्षा कमी</td><td>३ गुण</td></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या ९० टक्क्यांपेक्षा कमी</td><td>० गुण</td></tr>
</table></td><td>०५</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>
ब) सरल प्रणाली अंतर्गत आधार कार्ड संलग्नतेसह नोंदी
<table>
<tr><th>टक्केवारी</th><th>सरल प्रणाली अंतर्गत आधार कार्ड संलग्नतेसह नोंद</th></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या १०० टक्के किंवा अधिक</td><td>५ गुण</td></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या ९० टक्के वा ९० टक्क्यांपेक्षा अधिक परंतु १०० टक्क्यांपेक्षा कमी</td><td>३ गुण</td></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थी संख्येच्या ९० टक्क्यांपेक्षा कमी</td><td>० गुण</td></tr>
</table>
२) सर्व संवर्गांच्या कार्यशाळांतील प्रवेशितांच्या युडीआयडी प्रमाणपत्र आधार कार्ड संलग्नतेच्या नोंदीबाबत.
<table>
<tr><td>मान्य प्रवेशितांची संख्या</td><td></td></tr>
<tr><td>प्रवेशित संख्येच्या युडीआयडी प्रमाणपत्र संलग्न नोंदी</td><td></td></tr>
<tr><td>प्रवेशित संख्येच्या आधार कार्ड संलग्न नोंदी</td><td></td></tr>
</table>
अ) युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेच्या नोंदीबाबत.
<table>
<tr><th>टक्केवारी</th><th>गुण</th></tr>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या १०० टक्के युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेच्या नोंदी</td><td>५ गुण</td></tr>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या ९० टक्के वा ९० टक्क्यांपेक्षा अधिक युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेच्या नोंदी परंतु १०० टक्क्यांपेक्षा कमी</td><td>३ गुण</td></tr>
</table>
</td><td>०५</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>
<table>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या ९० टक्के पेक्षा कमी युडीआयडी प्रमाणपत्र संलग्नतेच्या नोंदी</td><td>० गुण</td></tr>
</table>
ब) आधार कार्ड संलग्नतेच्या नोंदीबाबत.
<table>
<tr><th>टक्केवारी</th><th>गुण</th></tr>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या १०० टक्के आधार कार्ड संलग्नतेच्या नोंदी (संख्या)</td><td>५ गुण</td></tr>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या ९० टक्के वा ९० टक्क्यांपेक्षा अधिक आधार कार्ड संलग्नतेच्या नोंदी (संख्या)</td><td>३ गुण</td></tr>
<tr><td>मान्य प्रवेशित संख्येच्या ९० टक्के पेक्षा कमी आधार कार्ड संलग्नतेच्या नोंदी (संख्या)</td><td>० गुण</td></tr>
</table>
३) विशेष शाळेतील विद्यार्थ्यांना केंद्र / राज्य शासनाकडून प्राप्त स्कॉलरशीप.
<table>
<tr><td>मान्य विद्यार्थ्यांची संख्या</td><td></td></tr>
<tr><td>केंद्र / राज्य शासनाकडून स्कॉलरशीप प्राप्त विद्यार्थ्यांची संख्या</td><td></td></tr>
</table>
<table>
<tr><th>टक्केवारी</th><th>गुण</th></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थ्यांच्या संख्येच्या ८० टक्के किंवा त्यापेक्षा अधिक विद्यार्थ्यांना स्कॉलरशीप मिळत असल्यास</td><td>२ गुण</td></tr>
<tr><td>मान्य विद्यार्थ्यांच्या संख्येच्या ५० टक्क्यांपेक्षा अधिक तथापि ८० टक्क्यांपेक्षा कमी विद्यार्थ्यांना स्कॉलरशीप मिळत असल्यास</td><td>१ गुण</td></tr>
</table>
</td><td>०२</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>
<table>
<tr><td>मान्य विद्यार्थ्यांच्या संख्येच्या ५० टक्क्यांपेक्षा कमी विद्यार्थ्यांना स्कॉलरशीप मिळत असल्यास</td><td>० गुण</td></tr>
</table>
४) अ) विशेष शाळा / कार्यशाळेचे संकेतस्थळ / गुगल मॅप
<table>
<tr><th></th><th>गुण</th></tr>
<tr><td>शाळेची स्वत:ची किंवा संस्थेची शाळेबद्दल माहिती असणारी चालू स्थितीतील व माहितीदर्शक वेबसाईट असल्यास</td><td>१ गुण</td></tr>
<tr><td>नसल्यास</td><td>० गुण</td></tr>
<tr><td>(वेबसाईटचा पत्ता देणे आवश्यक)</td><td></td></tr>
</table>
<table>
<tr><th></th><th>गुण</th></tr>
<tr><td>शाळा गुगल मॅपवर दिसत असल्यास</td><td>२ गुण</td></tr>
<tr><td>नसल्यास</td><td>० गुण</td></tr>
<tr><td>(गुगल मॅप लिंक उपलब्ध करून देणे आवश्यक)</td><td></td></tr>
</table>
</td><td>०१<br><br>०२</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.
दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| २. | **दिव्यांगत्त्वाच्या टक्केवारीनुसार मागील वर्षातील प्रवेशितांच्या दिव्यांगत्त्वाच्या तीव्रतेचे प्रमाण :**<br>**दिव्यांगत्त्वाचे टक्केवारीनुसार प्रमाण** — **गुण**<br>एकूण प्रवेशित संख्येपैकी ७५ टक्के किंवा त्यापेक्षा अधिक प्रवेशितांच्या दिव्यांगत्त्वाची तीव्रता ही ८० टक्के व त्याहून अधिक असल्यास, — ०४ गुण<br>एकूण प्रवेशित संख्येपैकी ७५ टक्के प्रवेशितांच्या दिव्यांगत्त्वाची तीव्रता ही ६० ते ८० टक्के या दरम्यान असल्यास, — ०३ गुण<br>एकूण प्रवेशित संख्येपैकी ७५ टक्के प्रवेशितांच्या दिव्यांगत्त्वाची तीव्रता ही ४० ते ६० टक्के या दरम्यान असल्यास, — ०२ गुण | ०४ | | | |
| ३. | **दिव्यांग शाळा/कार्यशाळेमध्ये शिकविणा-या/व्यवसाय प्रशिक्षण देणाऱ्या शिक्षक /निदेशक संवर्गातील कर्मचाऱ्यांचा दर्जा,**<br>शिक्षक/निदेशक संवर्गातील कर्मचाऱ्यांचे आरसीआयकडे नोंदणीकरण व त्याचे वेळोवेळी नुतणीकरण १०० टक्के असल्यास — ०३ गुण<br>शिक्षक/निदेशक संवर्गातील कर्मचाऱ्यांचे आरसीआयकडे नोंदणीकरण व त्याचे वेळोवेळी नुतणीकरण नसल्यास — ०० गुण | ०३ | | | |
| ४. | **दिव्यांग शाळा/कार्यशाळेमधील पद भरती,**<br>शासन निर्णय दिनांक १८ ऑगस्ट, २००४ अनुसार अनुज्ञेय सर्व पदे सातत्याने कार्यरत असल्यास — ०३ गुण<br>८० टक्क्यांपेक्षा जास्त पदे सातत्याने कार्यरत असल्यास — ०२ गुण<br>५० टक्क्यांपेक्षा जास्त पदे सातत्याने कार्यरत असल्यास — ०१ गुण | ०३ | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | ५० टक्क्यांपेक्षा कमी पदे सातत्याने कार्यरत असल्यास — ०० गुण | | | | |
| ॥ | **उपक्रमातील भौतिक सुविधा** | **२६ गुण** | | | |
| १. | **उपक्रमाची इमारत व दर्जा** | ०४ गुण | | | |
| २. | **उपक्रमाची इमारत**<br>(सदरची इमारत संस्थेच्या स्वत:च्या मालकीची/नोंदणीकृत करारान्वये भाडेतत्त्वावर घेतलेली/नोंदणीकृत दानपत्राद्वारे घेतलेली असल्यास/शासनाकडून अथवा शासनाच्या अंगीकृत उपक्रमाकडून अथवा स्थानिक स्वराज्य संस्थेकडून नोंदणीकृत बक्षीसपत्राने / भाडे करारान्वये मिळालेली असल्यास) | ०८ गुण | | | |

(मुद्दा १ अंतर्गत तक्ता)

| इमारत | गुण |
|---|---|
| आर.सी. सी. इमारत | ०४ गुण |
| सिमेंट, वीट, पत्रा / कौलारू छत असल्यास | ०२ गुण |
| उपरोक्त व्यतिरिक्त साधारण इमारत असल्यास | ०० गुण |

(मुद्दा २ अंतर्गत तक्ता)

| अ.क्र. | निकष | दिव्यांग शाळा | दिव्यांग कार्यशाळा | द्यावयाचे गुण |
|---|---|---|---|---|
| अ | इमारतीची मालकी | संस्थेच्या मालकीची असल्यास | संस्थेच्या मालकीची असल्यास | ०३ गुण |
| | | भाडेतत्त्वावर असल्यास | भाडेतत्त्वावर असल्यास | ०१ गुण |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | | | | | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ब | प्रती वर्गाच्या खोलीचे आकारमान | दिनांक १८ जुलै, २०१८ व दिनांक ५ फेब्रुवारी, २०१९ च्या शाळा संहितेनुसार वर्गखोल्या, (स्नानगृहे, शौचालय, अभ्यागत, कर्मचारी कक्ष, सभागृह, भोजनगृह, निवासगृह इ. बाबी अंतर्भुत) निवासी प्रति विद्यार्थी किमान ६० चौ.फुट. | दिनांक १८ जुलै, २०१८ व दिनांक ५ फेब्रुवारी, २०१९ च्या शाळा संहितेनुसार वर्गखोल्या, (स्नानगृहे, शौचालय, अभ्यागत, कर्मचारी कक्ष, सभागृह, भोजनगृह, निवासगृह इ. बाबी अंतर्भुत) निवासी प्रति विद्यार्थी किमान ६० चौ.फुट. | असल्यास ०२ गुण नसल्यास ०० गुण | | | | |
| | | | शाळा संहितेनुसार प्रति अनिवासी | शाळा संहितेनुसार प्रति अनिवासी | असल्यास ०२ गुण नसल्यास ०० गुण | | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | | | | | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | विद्यार्थी किमान ४० चौ.फुट. | विद्यार्थी किमान ४० चौ.फुट. | | | | | |
| | क | वर्गामध्ये प्रकाश व पंख्यांची सोय, प्रत्येक वर्गामध्ये एक फळा व एक डायस | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | ०१ गुण | | | | |
| | ड | शाळा / कार्यशाळेच्या इमारतीला कंपाऊंड | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | ०१ गुण | | | | |
| | इ | मुलांच्या / मुलींच्या सुरक्षेसाठी योग्य ती व्यवस्था (अग्निशमन, प्रथमोपचार) | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | असल्यास पूर्ण गुण. नसल्यास, ०० गुण | ०१ गुण | | | | |

**दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.**

**दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td>३.</td><td>शैक्षणिक साहित्य (असल्यास पूर्ण गुण, नसल्यास, ०० गुण)
<table>
<tr><td>अ</td><td>भौतिकोपचार / व्यवसायोपचार / वाचा उपचार / मानसोपचार प्रयोगशाळा करीता स्वतंत्र दालन</td><td>१ गुण</td></tr>
<tr><td>ब</td><td>भौतिकोपचार / व्यवसायोपचार / वाचा उपचार / मानसोपचार प्रयोगशाळा करीता आवश्यक ती साधन सामग्री</td><td>१ गुण</td></tr>
</table>
(दिव्यांग शाळा / कार्यशाळेतील प्रवेशार्थीमध्ये संशोधन वृत्ती वाढीस लागण्यासाठी आणि त्याची आकलनक्षमता विकसित होण्यासाठी आवश्यक साधनसामुग्री या हेतूने सदर निकष महत्वपूर्ण आहे.)</td><td>०२ गुण</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>४.</td><td>(१) शाळांकरीता (ग्रंथालय) (असल्यास पूर्ण गुण, नसल्यास, ०० गुण)
<table>
<tr><td>अ</td><td>ग्रंथालयामध्ये प्रत्येक पुस्तके/संदर्भग्रंथ वृत्तपत्रे, मासिके, नियतकालिके</td><td>००.५० गुण</td></tr>
<tr><td>ब</td><td>पुस्तकांकरिता कपाटे/वाचकांकरिता बसण्याची व्यवस्था</td><td>००.५० गुण</td></tr>
<tr><td>क</td><td>ग्रंथालय सुविधेचा सर्व विद्यार्थी/शिक्षकांसाठी शाळेच्या वेळेत व नंतरही अधिकाधिक वापर.<br>दिव्यांग शाळा / कार्यशाळेतील ग्रंथालयात प्रवेशार्थींच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने उपलब्ध साहित्य.</td><td>१ गुण</td></tr>
</table></td><td>०२ गुण</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

**दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.**

**दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>(२) कार्यशाळांकरीता : लाभार्थ्यांचा व्यवसाय किंवा त्यांना मिळालेली नोकरी
<table>
<tr><td rowspan="2">अ</td><td rowspan="2">किती लाभार्थ्यांनी स्वत:चा व्यवसाय सुरु केला अथवा नोकरी लागली. (संख्या)</td><td>गतवर्षीच्या एकूण लाभार्थी संख्या</td><td></td></tr>
<tr><td>त्यापैकी एकूण व्यवसाय सुरु केलेल्या / नोकरी प्राप्त झालेल्या लाथार्थ्यांची संख्या</td><td></td></tr>
<tr><td>१.</td><td colspan="3">गतवर्षी प्रशिक्षण पूर्ण करणाऱ्यांपैकी ३० टक्क्यांपेक्षा जास्त लाभार्थी असल्यास लाभार्थ्यांनी स्वत:चा व्यवसाय सुरु केला अथवा नोकरी मिळाली असल्यास ०२ गुण अन्यथा ०० गुण</td></tr>
</table></td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>५.</td><td>प्रसाधन गृहे (असल्यास पूर्ण गुण, नसल्यास, ०० गुण)
<table>
<tr><td>अ</td><td>प्रवेशितांसाठी प्रसाधन गृह (मान्य संख्येच्या प्रमाणात असल्यास )
<table>
<tr><th>प्रसाधन गृहांची संख्या</th><th>पुरुष / मुले</th><th>महिला / मुली</th><th>एकूण</th></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table></td><td>१.५ गुण</td></tr>
<tr><td>ब</td><td>प्रसाधनगृहासाठी मुबलक पाणी उपलब्धता</td><td>०.५ गुण</td></tr>
<tr><td>क</td><td>प्रसाधनगृहाची साफसफाई / स्वच्छता</td><td>१ गुण</td></tr>
</table></td><td>०३ गुण</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>६.</td><td>पिण्याच्या पाण्याची सुविधा
<table>
<tr><td>अ</td><td>स्थानिक स्वराज्य संस्थेमार्फत पिण्याच्या पाण्याचा पुरवठा नळाद्वारे होत असल्यास</td><td>२ गुण</td></tr>
</table></td><td>०२ गुण</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | ब — उपरोक्त शिवाय आरओ / युव्ही लावून बोअरवेल अथवा इतर पद्धतीने पिण्याच्या पाण्याची व्यवस्था असल्यास) — १ गुण<br>क — वरील पैकी कोणतीही व्यवस्था नसल्यास — ०० गुण | | | | |
| ७. | **संगणक कक्ष**<br>अ — शाळेमध्ये पुरेशा प्रमाणात संगणक असल्यास — ००.५० गुण<br>ब — संगणक प्रयोगशाळेत बसण्याची व्यवस्था असल्यास — ००.५० गुण<br>क — संगणक प्रयोगशाळेत इंटरनेट व्यवस्था असल्यास — ००.५० गुण<br>ड — संगणक प्रयोगशाळेचा शाळेच्या वेळेनंतर वापर होत असल्यास — ००.५० गुण<br>इ — यापैकी कोणतीही सुविधा नसल्यास — ०० गुण | ०२ गुण | | | |
| ८. | **क्रीडांगण व विद्यार्थ्याकरिता क्रीडासंदर्भात येणा-या सुविधा**<br>अ — शाळेकडे स्वत:ची क्रीडांगणासाठी पुरेशी जागा असल्यास — १ गुण<br>ब — शाळेतर्फे पुरविण्यात क्रीडासंदर्भातील सुविधा/साहित्य असल्यास — १ गुण<br>क — जिल्हा/राज्य/राष्ट्रीय स्तरावरील क्रीडा स्पर्धेत शाळेच्या विद्यार्थ्यांनी लगतच्या गतवर्षी प्रथम पारितोषिक प्राप्त केले असल्यास — १ गुण<br>इ — यापैकी कोणतीही सुविधा नसल्यास — ०० गुण | ०३ गुण | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

**दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना**

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| III | **शीघ्र उपचार, शीघ्र निदान व समुपदेशन केंद्र** | ५ गुण | | | |
| | अ<br>दिव्यांग शाळेच्या बाबतीत प्रवेशित विद्यार्थ्यांचे व त्यांच्या पालकांचे भावनिक व बौध्दिक समुपदेशन करण्यासाठी व दिव्यांगत्वाचे शीघ्र निदान व शीघ्र उपचार करण्यासाठी मुख्याध्यापक यांच्या अध्यक्षतेखाली आणि कार्यशाळेच्या बाबतीत व्यवसाय मार्गदर्शन करण्यासाठी कार्यशाळा प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली केंद्र राहील.<br>सदरचे केंद्र कार्यान्वित असल्यास पूर्ण गुण नसल्यास ०० गुण अनुज्ञेय होतील.<br>३ गुण | | | | |
| | ब<br>दिव्यांग शाळेच्या बाबतीत प्रवेशित विद्यार्थ्यांचे व त्यांच्या पालकांचे भावनिक व बौध्दिक समुपदेशन करण्यासाठी व दिव्यांगत्वाचे शीघ्र निदान व शीघ्र उपचार करण्यासाठी शाळेकडून केलेल्या कार्यवाहीची दैनंदिन नोंद ठेवलेली असल्यास पूर्ण गुण, नसल्यास ०० गुण.<br>कार्यशाळेच्या बाबतीत व्यवसाय मार्गदर्शन करण्यासाठी केलेल्या कार्यवाहीची दैनंदिन नोंद ठेवलेली असल्यास, पूर्ण गुण, नसल्यास ०० गुण.<br>२ गुण | | | | |
| IV | **उपक्रमातर्फे सामाजिक विकासाच्या अनुषंगाने आयोजित करण्यात येणारे विविध कार्यक्रम:** (असल्यास, पूर्ण गुण, नसल्यास ०० गुण.) | २ गुण | | | |
| | अ<br>वृक्षारोपण व वृक्षसंवर्धन केले असल्यास<br>०१ गुण | | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | ब — राष्ट्रीय एकात्मतेचे संस्कार घडविण्यासाठी उपक्रम राबविलेले असल्यास — ००.५०गुण<br>क — सामाजिक बांधिलकीचे मुल्य बिंबविण्यासाठी शाळेने आयोजित केलेल्या वरील कार्यक्रमांचा अभिलेख ठेवण्यात यावा व या सर्व कार्यक्रमांचे आयोजन व लाभ विचारात घेऊन शाळेस १ गुण अनुज्ञेय राहील. — ००.५०गुण | | | | |
| V | **दिव्यांग शाळा / कार्यशाळेतील विद्यार्थ्यांचा सहशालेय उपक्रमात (को- करिक्युलर ॲक्टिव्हीटीजमध्ये) सहभाग**<br><br>शाळेतील विद्यार्थ्यांचा जिल्हा / विभाग / राज्य राष्ट्रीय स्तरावरील विज्ञान (विज्ञान प्रदर्शने, ऑलम्पियाड, खेळ, साहित्य आदि स्पर्धामध्ये सहभाग, संगीत, कला, वक्तृत्व स्पर्धा तथा व्यक्तिमत्व विकासाचे उपक्रम व त्याकरिता शाळेतर्फे पुरविल्या जाणा-या सुविधा याबाबत शाळेत उपलब्ध अभिलेख. त्या अनुषंगाने शाळेस ३ गुण अनुज्ञेय राहतील. तसेच कार्यक्रमाच्या सहभागाबाबत पुरावा देणे आवश्यक राहील.<br>राज्य स्तरावरील सहभाग असल्यास — ३ गुण<br>विभागस्तरावरील सहभाग असल्यास — २ गुण<br>जिल्हा स्तरावरील सहभाग असल्यास — १ गुण<br>यापैकी काही नसल्यास — ०० गुण | ३ गुण | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| VI | **शाळांतर्फे इको फ्रेंडली, रेन वॉटर हार्वेस्टींग, अपारंपारिक ऊर्जा, पाण्याचा पुर्नवापर, याकरिता शाळेने केलेले प्रयत्न.**<br>१ किलावॅट क्षमतेचे सोलार वा इतर अपारंपारिक उर्जेचे किमान ३ रेन वॉटर हार्वेस्टिंग मेजर्स असल्यास — ३ गुण<br>उपरोक्त पैकी सोलार व इतर दोनपैकी कोणतेही एक असल्यास — २ गुण<br>उपरोक्त पैकी १ किलावॅट क्षमतेचे सोलार असल्यास — १ गुण<br>यौकी काही नसल्यास — ०० गुण | ३ गुण | | | |
| VII | **नोंदणी प्रमाणपत्राबाबतचे निकष**<br>मागील पाच वर्षांच्या कालावधीत नोंदणी प्रमाणपत्र रद्द एकदाही झालेले नसल्यास — ५ गुण<br>मागील पाच वर्षांच्या कालावधीत नोंदणी प्रमाणपत्र एकदाच रद्द होऊन अपिल आदेशान्वये पुनरूज्जीवित झालेले असल्यास — ३ गुण<br>मागील पाच वर्षांच्या कालावधीत दोन किंवा त्यापेक्षा जास्त वेळा नोंदणी प्रमाणपत्र रद्द होऊन अपिल आदेशान्वये पुनरूज्जीवित झालेले असल्यास — ०० गुण | ५ गुण | | | |
| VIII | **उपक्रमांतील प्रवेशितांच्या उपस्थितीची नोंद**<br>मागील पाच वर्षांच्या कालावधीत शाळा / कार्यशाळेतील प्रवेशितांच्या उपस्थितीची नोंद बायोमेट्रीक पध्दतीने आधार लिंकद्वारे नोंदविण्यात आलेली असल्यास — ३ गुण | ३ गुण | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| | मागील पाच वर्षांच्या कालावधीत शाळा / कार्यशाळेतील प्रवेशितांच्या उपस्थितीची नोंद बायोमेट्रीक पध्दतीने नोंदविण्यात आलेली असल्यास परंतु, वेब-बेसड् लिंक नसल्यास | २ गुण | | | | |
| | मागील पाच वर्षांच्या कालावधीत शाळा / कार्यशाळेतील प्रवेशितांच्या उपस्थितीची नोंद बायोमेट्रीक पध्दतीने वेब-बेसड् लिंकद्वारे नोंदविण्यात आलेली नसल्यास | ०० गुण | | | | |
| IX | **उपक्रमांचे व्यवस्थापन** | | ६ गुण | | | |
| | १. शालेय / कार्यशाळा व्यवस्थापन समितीचे गठन<br>२. पालक-शिक्षक संघाची स्थापना<br>३. भोजन व्यवस्थापन समितीचे गठन<br>४. दिव्यांग प्रवेशितांच्या समस्येचे निराकरण करण्यासाठी तक्रार निवारण अधिकाऱ्याची नियुक्ती<br>५. वसतीगृह व्यवस्थापन समिती समितीचे गठन | ५ गुण | | | | |
| | अ) या सर्व समित्यांचे गठण केलेले असल्यास | ५ गुण | | | | |
| | वरीलपैकी कोणत्याही चार समित्यांचे गठन केलेले असल्यास | ४ गुण | | | | |
| | वरीलपैकी कोणत्याही तीन समित्यांचे गठन केलेले असल्यास | ३ गुण | | | | |
| | वरीलपैकी कोणत्याही दोन समित्यांचे गठन केलेले असल्यास | २ गुण | | | | |
| | वरीलपैकी कोणत्याही एका समितीचे गठन केलेले असल्यास | १ गुण | | | | |
| | वरीलपैकी कोणत्याही समित्यांचे गठन केलेले नसल्यास | ० गुण | | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | ब) सदर समित्यांच्या गणपुर्तीसह बैठका होऊन त्याचे इतिवृत्त निर्गमित झाले असल्यास पूर्ण गुण अन्यथा ०० गुण — १ गुण | | | | |
| X | **उपक्रमाची सुगम्यता**<br>केंद्र शासनाने अंमलात आणलेल्या सुगम्य भारत अभियानातील निकषांप्रमाणे उपक्रमाची इमारत सुगम्यपूर्ण असल्यास व तसे संबंधीत सक्षम प्राधिकरणाने प्रमाणित केलेले असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील. — ५ गुण<br>केंद्र शासनाने अंमलात आणलेल्या सुगम्य भारत अभियानातील निकषांप्रमाणे उपक्रमाची इमारत सुगम्यपूर्ण असल्यास परंतु तसे संबंधीत सक्षम प्राधिकरणाने प्रमाणित केलेले नसल्यास — ३ गुण<br>केंद्र शासनाने अंमलात आणलेल्या सुगम्य भारत अभियानातील निकषांप्रमाणे उपक्रमाची इमारत सुगम्यपूर्ण नसल्यास — ० गुण | ५ गुण | | | |
| XI | **उपक्रमांतील प्रवेशितांच्या सुरक्षिततेसंबंधी केलेल्या उपाययोजना**<br>अ) **निवासी उपक्रमाबाबत –**<br>निवासी इमारतीत व सभोवतालच्या परिसरात संस्थेने सी.सी.टि.व्ही. इन्स्टॉलेशन व २४ तास कार्यान्वित केलेले असल्यास तसेच किमान एक महिन्याचे डाटा स्टोरेजची क्षमता असल्यास — ३ गुण | ५ गुण | | | |

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | प्रवेश व निष्कासाच्या ठिकाणी अभ्यागतांची नोंद घेतली जात असल्यास आणि सदरची नोंद उपक्रम प्रमुखाने किमान आठवड्यातून एकदा प्रमाणित केली जात असल्यास — १ गुण<br>रात्रीच्या वेळी इमारतीच्या आवारात संस्थेने नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्याकडून ठराविक अंतराने गस्त घातली जात असल्यास व सदर गस्तीची व कर्तव्यावर नियुक्त असलेल्या संबंधित कर्मचाऱ्याची रजिस्टरमध्ये वेळोवेळी नोंद घेतली जात असल्यास — १ गुण<br>वरील प्रमाणे सर्व प्रकारे खबरदारीच्या उपाययोजना केलेल्या असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील अन्यथा वरील उपाय योजनानिहाय गुण अनुज्ञेय राहतील.<br>आ) **अनिवासी उपक्रमाबाबत** :<br>अनिवासी इमारतीत व सभोवतालच्या परिसरात संस्थेने सी.सी.टि.व्ही. इन्स्टॉलेशन व किमान उपक्रमाच्या वेळेत कार्यान्वित केलेले असल्यास तसेच किमान एक महिन्याचे डाटा स्टोरेजची क्षमता असल्यास — २ गुण<br>प्रवेश व निष्कासाच्या ठिकाणी अभ्यागतांची नोंद घेतली जात असल्यास आणि सदरची नोंद उपक्रम प्रमुखाने किमान आठवड्यातून एकदा प्रमाणित केली जात असल्यास — १ गुण<br>प्रवेशितांची ने-आण करण्याकरीता संस्थेच्या मालकीच्या अथवा भाडेतत्वावर वाहनाची व्यवस्था केलेली असल्यास व त्याकरीता चालक व वाहक नियुक्त केलेले असल्यास — २ गुण | | | | |

**दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.**

**दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>वरील प्रमाणे सर्व प्रकारे खबरदारीच्या उपाययोजना केलेल्या असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील अन्यथा वरील उपाय योजनानिहाय गुण अनुज्ञेय राहतील.</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>XII</td><td>वैद्यकिय आणि आरोग्य विषयक सुविधा व व्यवस्थापन<br>अ) निवासी उपक्रमांबाबत –<br><table><tr><td>सर्व निवासी प्रवेशितांची अधिकृत वैद्यकिय तज्ञांकडून किमान महिन्यातून एकदा सर्वंकष वैद्यकिय तपासणी करण्यात येत असल्यास</td><td>२ गुण</td></tr><tr><td>अतितातडीच्या वैद्यकिय कारणास्तव संस्थेने प्रवेशित रुग्णास नजिकच्या दवाखान्यात नेण्याकरीता स्वमालकीच्या किंवा भाडेतत्त्वावरील वाहनाची व्यवस्था ठेवलेली असल्यास</td><td>१ गुण</td></tr><tr><td>निवासी इमारतीत ठराविक अंतराने केश कर्तन, दररोज आंघोळ, प्रवेशित परिधान करीत असलेल्या दररोजच्या वापरातील कपड्यांची स्वच्छता, इमारत व सभोवतालच्या परिसराची वारंवार स्वच्छता, सांडपाण्याची नीटनेटकी व्यवस्था, इ. प्रकारे वैद्यकिय आणि आरोग्य विषयक सुविधा व व्यवस्थापन ठेवले जात असल्यास.</td><td>२ गुण</td></tr></table><br>वरील प्रमाणे सर्व प्रकारे खबरदारीच्या उपाययोजना केलेल्या असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील अन्यथा वरील उपाय योजनानिहाय गुण अनुज्ञेय राहतील.</td><td>५ गुण</td><td></td><td></td><td></td></tr>
</table>

| अ.क्र. | बाबींचे विवरण | गुण एकूण १०० पैकी | संस्थेचे स्वयंमुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन | जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | आ) **अनिवासी उपक्रमाबाबत** :-<br>सर्व अनिवासी प्रवेशितांची अधिकृत वैद्यकिय तज्ञांकडून किमान महिन्यातून एकदा सर्वंकष वैद्यकिय तपासणी करण्यात येत असल्यास — २.५ गुण<br>अतितातडीच्या वैद्यकिय कारणास्तव संस्थेने प्रवेशित रुग्णास नजिकच्या दवाखान्यात नेण्याकरीता स्वमालकीच्या किंवा भाडेतत्त्वावरील वाहनाची व्यवस्था ठेवलेली असल्यास — २.५ गुण<br>वरील प्रमाणे सर्व प्रकारे खबरदारीच्या उपाययोजना केलेल्या असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील अन्यथा वरील उपाय योजनानिहाय गुण अनुज्ञेय राहतील. | | | | |
| XIII | **सकस व चौरस आहार, दर्जा व व्यवस्थापन**<br>अ) **निवासी उपक्रमांबाबत** :<br>अन्न प्रशासन विभागाचे प्रमाणपत्र धारण करीत असल्यास — ३ गुण, नसल्यास ० गुण<br>आहार तज्ञाने प्रमाणित केलेल्या आहार प्रकारानुसार सर्व निवासी प्रवेशितांना सकस व चौरस आहार देण्यात येत असल्यास तसेच निवासी उपक्रमांत तयार करण्यात आलेल्या आहाराची चव रजिस्टरमध्ये उपक्रम प्रमुखाकडून दररोज नोंद घेतली जात असल्यास — १ गुण, नसल्यास ० गुण<br>आहार तक्ता तयार करून सर्वांना दिसेल अशा ठिकाणी फलकावर लावलेला असल्यास — १ गुण, नसल्यास ० गुण | ७ गुण | | | |

**दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.**

**दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>बाबींचे विवरण</th><th>गुण एकूण १०० पैकी</th><th>संस्थेचे स्वयंमुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे मुल्यांकन</th><th>जिल्हा मुल्यांकन समितीचे अभिप्राय</th></tr>
<tr><td></td><td>
<table>
<tr><td>आहारामध्ये आठवड्यातून एकदा मांसाहारी किंवा गोड आहार दिला जात असल्यास</td><td>१ गुण<br>नसल्यास ० गुण</td></tr>
<tr><td>आहारामध्ये दूध, अंडी व ताज्या फळांचा समावेश असल्यास</td><td>१ गुण<br>नसल्यास ० गुण</td></tr>
</table>
वरील प्रमाणे सर्व प्रकारे खबरदारीच्या उपाययोजना केलेल्या असल्यास पूर्ण गुण अनुज्ञेय राहतील. अन्यथा वरील उपाय योजनानिहाय गुण अनुज्ञेय राहतील.<br><br>
आ) अनिवासी उपक्रमाबाबत :<br>
१) अनिवासी उपक्रमांमध्ये मध्यान्ह भोजन देत असल्यास, ०३ गुण, नसल्यास ०० गुण अनुज्ञेय,<br>
२) मुला-मुलींना नेण्या-आणण्यास बस / ऑटो / व्हॅन सेवा असल्यास ०२ गुण, नसल्यास ०० गुण,<br>
३) गत ३ वर्षात केंद्र शासनाचे अनुदान प्राप्त झाले असल्यास ०२ गुण, नसल्यास ०० गुण.<br>
४)
</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td></td><td></td><td></td><td>अर्जदाराचे नाव, पदनाम व स्वाक्षरी</td><td>मुल्यांकन समितीच्या सदस्यांचे नांव / पदनाम व स्वाक्षरी</td><td></td></tr>
</table>

दिव्यांग कल्याण विभाग, शासन निर्णय क्रमांक : इडीडी-२०२२ / प्र. क्र. ६५ / दि. क. १, दिनांक १६ जुलै, २०२४ सोबतचे प्रपत्र.

दिव्यांगांच्या विशेष शाळा, कार्यशाळा तसेच अनाथ मतिमंदांकरीताची बालगृहे संलग्न विशेष शाळा आणि कार्यशाळा यांच्या स्वयंमुल्यांकनाचा नमुना

| **गुणांकन तक्ता :** | | |
|---|---|---|
| | एकूण गुणांकन : | १०० पैकी |
| | प्राप्त गुणांकन : | |
| **श्रेणी करण** | | |
| | ७५ किंवा त्यापेक्षा अधिक गुण मिळाल्यास | अ श्रेणी |
| | ६० ते ७४ गुण मिळाल्यास | ब श्रेणी |
| | ६० पेक्षा कमी गुण मिळाल्यास | क श्रेणी |

**तपासणीचा दिनांक :**

**तपासणीची वेळ :**

**तपासणी करणाऱ्या अधिकाऱ्याची स्वाक्षरी :**

**पदनाम :**

**कार्यालयाचा संपूर्ण पत्ता :**